बसवेश्वर बसवण्णा म्हणूनही ओळखले जातात. भारतातील श्रेष्ठ संतांमध्ये त्यांची गणना होते. बंडखोर संत, श्रेष्ठ कन्नड कवी, साक्षात्कारी योगी पुरुष आणि कळकळीचे समाजसुधारक असलेले बसवेश्वर हे कर्नाटकातील नव्या युगाचे प्रेषित होत.

इ.स. 1131 च्या सुमारास एका संपन्न, सुप्रतिष्ठित ब्राह्मण कुटुंबात जन्मलेल्या बसवेश्वरांनी वेद, उपनिषदे, पुराणे यांचा कसून अभ्यास केला. तथापि, जातिभेद नष्ट करुन सर्वसामान्य आणि जातिबहिष्कृत लोकांना आध्यात्मिक साक्षात्काराच्या दैवी अनुभूतीपर्यंत पोहोचविण्यासाठी त्यांनी आयुष्यभर संघर्ष केला. बसवेश्वरांचे सामाजिक धार्मिक विचारपीठ म्हणजेच अनुभवमंडप हा देशाच्या विभिन्न प्रांतांतील साधकांचा प्रेरणास्रोत ठरला.

'वचन'चा शब्दशः अर्थ गद्य असा आहे. बसवेश्वरांनी आपल्या अभिव्यक्तीसाठी वचनप्रकार निवडल्यावर त्याला नवी झळाळी प्राप्त झाली. त्यांनी कन्नड साहित्याच्या आशय आणि अभिव्यक्तीत क्रांती घडवून आणली. त्यांचे काव्य हे जीवनाचे काव्य आहे. साहित्य अकादेमीने यापूर्वीच बसवेश्वरांची कानडीतील निवडक वचने प्रकाशित केली आहेत.

साहित्य अकादेमी पारितोषिकप्राप्त कन्नड साहित्यिक एच् . तिप्पेरुद्रस्वामी यांनी या सुरस चरित्रग्रंथात बसवेश्वरांचे विविधांगी व्यक्तिमत्त्व चित्रित केले आहे.

रोहिणी तुकदेव यांनी या चरित्राचे मराठी भाषांतर केले आहे. त्या प्रामुख्याने समीक्षालेखन करतात. मराठी कादंबरी हे त्यांच्या व्यासंगाचे विशेष क्षेत्र आहे.




Basaveshwara (Marathi) Rs. 25
ISBN 81-260-1666-3

24 भाषांमधुन पुस्तके प्रकाशित करणारी साहित्य अकादेमी
जगातील सर्वात मोठी प्रकाशन संस्था

website : http://www.sahitya.akademi.gov.in




भारतीय साहित्याचे निर्माते

# बसवेश्वर

एच.तिप्पेरुद्रस्वामी



अस्तरावरील पाषाण चित्रात राजा शुद्धोदनाच्या दरबारातील दृश्य आहे. त्यात तीन ज्योतिषी बुद्धाची आई, मायाला स्वप्नाचा अर्थ समजावून सांगत आहेत. इ.स. दुसऱ्या शतकातील नागार्जुन-कोंडा येथील एका शिलात कोरलेल्या या प्रसंगात खालच्या बाजूला बसलेला राजचिटणवीस स्वप्नाचा अर्थ लिहून घेत आहे. भारतीय लेखन कलेचा शिल्पबद्ध पुरावा देणारे हे अत्यंत पुरातन शिल्प असावे असा अंदाज आहे.

राष्ट्रीय संग्रहालय, नवी दिल्ली, यांच्या सौजन्याने

भारतीय साहित्याचे निर्माते

# बसवेश्वर


लेखक

**एच्. तिप्पेरुद्रस्वामी**

अनुवादिका

**रोहिणी तुकदेव**





**साहित्य अकादेमी**

Basaveshwara (बसवेश्वर) :
Marathi translation by Rohini Tukdev of
H. Thipperudraswami's monograph in Kannada
Sahitya Akademi, New Delhi (2006), Rs. Twenty five


First Edition : 2003
Reprint : 2006

**Published by :**
Sahitya Akademi

**Head Office :**
Rabindra Bhavan, 35, Ferozeshah Road, New Delhi 110 001

**Sales Department :**
Basement in 'Swati', Mandir Marg, New Delhi 110 001

**Regional Offices :**
172, M. M. G. S. Marg, Dadar (East), Mumbai 400 014
Jeevan Tara, 23A/44X, Diamond Harbour Road, Kolkata 700 053
Central College Campus, Dr. Ambedkar veedhi, Bangalore 560 001

**Chennai Office :**
Guna, 443 Anna Salai, Teynampet, Chennai 600 018

**ISBN 81-260-1666-3**

मूल्य : 25 रुपये

**Printed at** : Chintanakshar Grafics, Wadala, Mumbai – 400 031

# अनुक्रमणिका

1

# जीवन-कथा (चरित्र)

सध्याच्या काळातील मानवी समस्यांचे स्वरुप पूर्वी कधीही नव्हते एवढे गुंतागुतीचे झाले आहे. आधुनिक मानवाने ज्ञान आणि सत्तासामर्थ्य यात अभूतपूर्व वर्चस्व प्राप्त केले यात शंका नाही. पण; त्यामुळे पूर्वी कधीही न घडलेले बदलही घडून आले. परिणामी, आपले आयुष्य केवळ गुंतागुंतीचे (व्यामिश्र) नव्हे, तर अनागोंदी स्वरुपाचे झाले आहे. आपण नित्य नव्या बदलाच्या भोवऱ्यात सापडलो आहोत. अशा बिकट परिस्थितीत, पूर्वी कधीही नव्हती एवढ्या मोठ्या प्रमाणात आध्यात्मिक शिकवणुकीची आवश्यकता निर्माण झाली आहे. आपल्या रटाळ जीवनातून बाहेर पडण्यासाठी लागणारी आत्मिक ऊर्जा आपल्याला जगातले मोठे संत व कवी मिळवून देतात. कर्नाटकातील बसवेश्वर ऊर्फ बसवबण्णा हा असाच एक संत, कवी आणि कळकळीचा समाजसुधारक होता. भारतातील प्रमुख आध्यात्मिक गुरुमध्ये त्याची गणना होते.

आधुनिक भारतामधील सामाजिक परिवर्तनाच्या आणि धार्मिक जागृतीच्या संदर्भात बसवेश्वराच्या शिकवणुकीला विशेष अर्थपूर्णता प्राप्त होते. सध्या, लोकशाही व राष्ट्रवाद ही मूल्ये स्वीकारून, शिक्षणाचा प्रसार, वैज्ञानिक दृष्टिकोण अशा बाबींवर भर देऊन भारतीय, समाजाची पुनर्रचना चालू आहे. मुख्य जागतिक विचार प्रवाहात ती प्रभावित झाली आहे. आपली विचारपद्धती इतकी आमूलाग्र बदलते आहे की, काही जुनी मूल्ये, जात-पात रुढी यासारख्या सामाजिक संस्था अथवा कर्मकांड, अंधश्रद्धा यासारखे रीतीरिवाज याबाबी तगून राहाणे आता अवघड आहे. बसवण्णा जरी आठशे वर्षापूर्वीच्या काळातील असला तरी त्याची शिकवण पूर्णपणे आधुनिक आणि व्यवहार्य असल्यामुळे आजही काळाशी सुसंगत वाटते. त्याची शिकवण अनुसरली गेली असती तर भारतीय समाजाचे चित्र वेगळे झाले असते. बसवण्णाच्या धर्मविचाराच्या गाभ्यात स्वामी दयानंद, स्वामी विवेकानंद आणि गांधीजी यांच्यासारख्या आधुनिक प्रेषितांची शिकवण आढळते. त्याला केवळ कर्नाटकातीलच नव्हे, तर अखिल भारतातील नव्या युगाचे प्रेषित संबोधणे युक्त ठरेल.

बसवण्णाच्या जीवितकथेचा अभ्यास करण्याआधी त्यांची समकालीन धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थिती लक्षात घेणे उपयुक्त ठरेल.

इतिहासाच्या प्रारंभकाळापासून कर्नाटकाने जगातील सर्व धर्मांबाबत उदार दृष्टिकोण स्वीकारलेला आहे. शिलालेखातील पुरावे लक्षात घेता, असे म्हणता येईल की इसवीसनापूर्वी सबंध देशभर आर्य अथवा वैदिक धर्माचा पगडा होता. त्याला राजाश्रयही होता. वैदिक धर्माप्रमाणेच, प्राचीन कर्नाटकात नाग, वृक्ष आणि अन्य अनेक ग्रामदेवदेवतांची उपासना चालत असे.

त्या नंतरच्या काळात जैन व बौद्ध धर्मसंप्रदाय उदयाला आले. उत्तर भारताइतक्या मोठ्या प्रमाणात कर्नाटकात बौद्धधर्म स्थिरावला अथवा फोफावला नाही. जैनधर्माच्या तुलनेत तो दक्षिणभारतातून फार लवकर ऱ्हास पावला. कर्नाटकातील जवळजवळ सर्वच राजघराण्यांनी आणि राजसत्तांनी जैनधर्माला राजाश्रय दिला. त्यामुळे कर्नाटक संस्कृतीमध्ये जैन धर्माने मोलाची आणि महत्वपूर्ण भर घातली.

सुमारे बाराव्या शतकापासून पुढे जैनधर्माला उतरतील कळा लागली. आठव्या शतकाच्या सुमारास दक्षिणभारताच्या क्षितिजावर शंकराचार्य नावाचा एक महापुरुष उदयाला आला. केरळमध्ये जन्मलेल्या शंकराचार्यांनी संपूर्ण भारतभर फिरुन अद्वैतवादाची शिकवण दिली आणि वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन केले. आपल्या पहिल्या मठाच्या स्थापनेसाठी त्यांनी कर्नाटकातील शृंगेरी हे स्थळ निवडले.

शैव संप्रदाय हा कर्नाटकातील सर्वात जुना आणि बहुप्रचलित संप्रदाय होता. पाशुपत, कालामुख आणि कापालिक हे त्याचे उपपंथ होते. काश्मिरी आणि तमिळ शैव संप्रदायांचा देखिल कर्नाटकातील शैव सांप्रदायिकांवर मोठा प्रभाव होता. कालामुख पंथाचे काही आचार्य आणि मठाधिपती गाढे विद्वान होते, तसेच ते कर्नाटकात अतिशय लोकप्रिय होते.

बाराव्या शतकाच्या प्रारंभी विशिष्टाद्वैताचा पुरस्कार करणाऱ्या रामानुजांचा उदय झाला. चोल राजाने वैष्णवांचा छळ आरंभिल्यामुळे रामानुज तामिळनाडूतून बाहेर पडले. धर्मविचारातील स्वातंत्र्याची परंपरा असलेल्या कर्नाटकाने एकेकाळी ज्याप्रमाणे शंकराचार्यांचे स्वागत केले होते त्याप्रमाणे आता रामानुजांचेही केले. होयसळचा राजा विष्णुवर्धन रामानुजाचा शिष्य बनला. तेव्हापासून जैनधर्माचा प्रभाव ओसरु लागला. पुन्हा एकदा वैदिक धर्माचे वर्चस्व प्रस्थापित झाले.

या काळात, शंकराचार्य आणि रामानुज यासारख्या आचार्यांची शिकवण असूनसुद्धा त्या काळातील वैदिक धर्म अध:पतित होऊन त्याला कर्मठ व कर्मकांडाचे स्वरुप प्राप्त झाले. उपनिषदातील सुंदर, द्रष्टेपण पंथोपपंथातील रुढिग्रस्ततेमुळे झाकोळले गेले. भोळ्या समजुती आणि अंधश्रद्धांची बांडगुळे समाजात वाढू लागली. बळी देण्याची प्रथा मोठ्या प्रमाणावर प्रचलित होती.



ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशी चातुर्वर्ण्यव्यवस्था तिच्या निर्मिती हेतूच्या दृष्टीने अगदी प्रारंभीच्या काळात कदाचित उपयुक्त ठरली असेलही; पण पुढे काळाच्या ओघात मात्र तिने समाजाचे विघटनच केले. मूलत: ते समाजबांधणीचे मजबूत तत्त्व म्हणून निर्माण झाले असावे. मात्र पुढे त्याचे पर्यवसान विघातक जातिव्यवस्थेत झाले. जन्मावर आधारित विभागणीचे प्रमुख तत्त्व असलेल्या या घृणास्पद व्यवस्थेने सामाजिक ऐक्य धोक्यात आणले.

उच्चवर्णीय आणि शूद्र मानले गेलेल्यांमध्ये काटेकोर भेदरेषा आखण्यात आली. एवढेच नव्हे तर, हे वर्णही असंख्य जाती- उपजातीत विभागले गेले. धर्म, ही मूठभर लोकांची मक्तेदारी बनली. स्त्रियांना व शूद्र मानले गेलेल्यांना वेदाध्ययनाचा अधिकार नाकारला गेला. या भूमिकेचे समर्थन करण्यासाठी जुन्या धर्मग्रंथांचे सोयीस्कर अर्थ लावले गेले तसेच नव्या ग्रंथांची निर्मितीही करण्यात आली. अशाप्रकारे सामाजिक अन्यायाला धार्मिक मान्यता दिली गेली. त्यातच, अस्पृश्यतेसारख्या लज्जास्पद रुढीची भर पडली. अस्पृश्य मानले गेलेल्यांची अवस्था अत्यंत दयनीय होती. त्यांना पशूहूनही हीन वर्तवणूक दिली जाई. उच्च सांस्कृतिक परंपरा आणि उज्ज्वल आध्यात्मिक वारसा लाभूनही सर्वसामान्य जनतेच्या गरजा आणि आकांक्षा पुऱ्या करण्यात हिंदू समाजाला दारुण अपयश आले. नेमक्या अशा निकडीच्या काळात बसवेश्वराचा उदय झाला.

ऐतिहासिक सामग्रीच्या आधारे तयार केलेले बसवेश्वराचे विश्वसनीय चरित्र अद्यापि उपलब्ध नाही. तथापि, समकालीन शिलालेख-ताम्रपट, वीरशैव पंथाच्या लेखकांनी (पंथियांनी) लिहिलेली पुराणे, तसेच बसवण्णा, चनबसवण्णा, अल्लमप्रभू, सिद्दराम, अक्कमहादेवी आणि 'अनुभव मंडपां' च्या अन्य संतकवींच्या वचनांच्या आधारे बसवेश्वरांच्या चरित्राची पुनर्बांधणी करता येते.

सुदैवाने बसवण्णांशी संबंधित असे दोन ऐतिहासिक कोरीव लेख उजेडात आले आहेत. त्यांच्या जीवनातील काही पैलूंवर प्रकाश टाकणारा हा विश्वसनीय पुरावा महत्वपूर्ण आहे. एकंदर वीरशैव वाङ्मयातील 'बसवराज देवर रगळे' हा कन्नडमधील ग्रंथ आणि 'बसवपुराणमु' हा तेलगू ग्रंथ असे दोन्ही ग्रंथ त्यांचे लेखक अनुक्रमे हरिहर आणि पालकुरिके सोमनाथ बसवेश्वरांचे समकालीन असल्यामुळे (चरित्र लेखनाचे आधार म्हणून) महत्वपूर्ण आहेत. त्याचप्रमाणे, भीमकवीचे 'बसवपुराण', लक्काण्णा दांडेशाचे 'शिवतत्त्वचिंतामणी' आणि 'शिंगिराज पुराण' म्हणून लोकप्रिय असलेले शिंगिराजाने लिहिलेले 'अमल बसव चरित्र' विचारात घेणेही युक्त ठरेल. हे खरे की, या ग्रंथांचा हेतू वस्तुनिष्ठ इतिहास मांडणे हा नसून, बसवेश्वरावर स्तुतिपर व भक्तिपर स्तोत्रे रचून त्यांचे दैवतीकरण करण्याचा आहे. तरी देखील चिकित्सक दृष्टीने या ग्रंथांचा केलेला अभ्यास काही ऐतिहासिक घटनांवर प्रकाश टाकू शकेल.

विवादास्पद तपशील टाळून, उपलब्ध साधनसामग्रीच्या आधारे बसवण्णांचे संक्षिप्त चरित्र या पुस्तकात मांडण्याचा प्रयत्न आहे.

इसवी सन 1131 च्या सुमारास कर्नाटकातील सध्या विजापूर या नावाने ओळखल्या जाणाऱ्या जिल्ह्यातील इंगळेश्वर-बागेवाडी गावातील एका सुप्रतिष्ठित ब्राह्मण कुटुंबात बसवण्णांचा जन्म झाला. त्याचे वडील मादिराज उर्फ मादरस बागेवाडी अग्रहाराचे प्रमुख होते. त्यांना 'ग्रामणिमणी' म्हणत असत. त्यांची पत्नी मादलांबा उर्फ मादंबा श्रद्धाळू होत ती बागेवाडीच्या नंदीश्वर या ग्रामदेवतेची परमभक्त होती.

बसवण्णा हे त्यांचे तिसरे अपत्य. त्याच्या मोठ्या भावाचे नाव देवराज आणि वडील बहिणीचे नाव नागम्मा. पैकी नामम्माने पुढील काळात बसवण्णाच्या सामाजिक आणि धार्मिक उपक्रमात सक्रिय भाग घेतला.

बसवण्णाच्या जन्मानंतर त्याला शुभाशीर्वादपर लिंग दीक्षा देण्यासाठी आणि नव्या पंथाची दीक्षा देण्यासाठी कूडलसंगमहून थोर शैव संत जातवेदमुनी तथा ईशान्य गुरु तेथे आले.

अगदी लहान असतानाच बसवामध्ये स्वतंत्र बाण्याची व श्रेष्ठत्वाची चिन्हे दिसत होती. तो विचक्षण आणि स्वतंत्र मनोवृत्तीचा होता. सनातनी ब्राह्मण कुटुंबात जन्मल्यामुळे आपल्या घरात आणि भोवतालच्या परिसरात, शेजारी-पाजारी कटाक्षाने पाळले जाणारे कर्मठ विधी आणि कडक रीतीरिवाज ह्याबद्दल मनात खळबळ माजविणारे अनेक प्रसंग त्याच्या आयुष्यात आले. धर्माच्या नावाखाली अंधश्रद्धेचा आणि पोथीनिष्ठेचाच पगडा लोकांच्या मनावर असल्याचे तसेच मंदिरे देखील शोषणाची केंद्रे बनल्याचे त्याच्या ध्यानात आले. यामुळे लहानगा बसव ह्या गोष्टींवर विचार करीत असे.

वयाच्या आठव्या वर्षी त्याला आयुष्यातील पहिल्या संघर्षाला तोंड द्यावे लागले. आई-वडिलांनी चालविलेल्या मुंजीच्या तयारीला त्याने कडाडून विरोध केला. आपल्या जन्माच्यावेळीच लिंगधारणाद्वारे आपले उपनयन झाले आहे, असे त्याचे म्हणणे होते. मुंजविधी केलाच पाहिजे असा वडिलांनी आग्रह धरल्यामुळे त्याने आई-वडिलांचे घर सोडले आणि तो कूडलसंगमला गेला.

हरिहराने हा प्रसंग काहीशा वेगळ्या प्रकारे वर्णिला आहे. त्याच्या म्हणण्यानुसार, बसवाची मुंज झाली. पुढे तो सोळा वर्षाचा झाला तेव्हा त्याने यज्ञोपवित फेकून दिले आणि गृहत्याग करुन तो कूडलसंगमला गेला. मात्र इतर सर्व लेखकांचे, मुंजीचा समारंभ झाला नाही, यावर एकमत आहे. निव्वळ जातीच्या श्रेष्ठत्वाचे प्रतीक बनलेल्या मुंजीसारख्या विधीसाठी त्याने कोणत्याही प्रकारची तडजोड केली नाही, हे मात्र निर्विवाद आहे. त्याच्या मते लिंगधारणा कोणत्याही जातीची निदर्शक नसते. ते



एक भक्तीचे साधन आहे. कोणत्याही जाती धर्माची व्यक्ती, मग ती स्त्री असो अथवा पुरुष लिंग धारण करु शकते.

सामाजिक आणि धार्मिक समतेच्या पुरस्कारासाठी शिवलिंगाचे प्रतीक परिणामकारकरीतीने उपयोजिले जाऊ शकते, याचा अगदी लहानपणीच प्रत्यय आल्यामुळे लिंगधारणा हीच दीक्षा असलेल्या वीरशैवपंथाकडे तो आकृष्ट झाला. कूडलसंगमातील वास्तव्याने त्याच्या विचाराला नवे चैतन्य प्राप्त झाले व त्याला नवी दृष्टी लाभली.

कृष्णा आणि तिची उपनदी मलप्रभा यांच्या संगमावर वसलेले कूडलसंगम हे त्या काळातील एक मोठे अध्ययनकेंद्र होते. लहानपणापासून बसवण्णाने या संगमाची कीर्ती ऐकली होती आणि बहुधा तो त्या पवित्र स्थळी गेलाही होता. आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी की, अर्भकावस्थेत बसवण्णाला लिंगधारणाद्वारे वीरशैवपंथाची दीक्षा देणारे ईशान्य गुरुच त्या अध्ययनकेंद्राचे स्थानपती किंवा कुलपती होते. त्यामुळे बसवण्णाने जेव्हा सर्व सामाजिक बंधने तोडून ज्ञान प्रकाशाच्या शोधार्थ गृहत्याग केला तेव्हा त्याचे पाय आपोआप कूडलसंगमाकडे वळले. त्याचा लळा असलेली त्याची मोठी बहीण नागम्माही त्याच्याबरोबर कूडलसंगमाला गेली. दरम्यानच्या काळात तिचा विवाह झाला होता आणि शिंगिराजाच्या ग्रंथानुसार तिचा पती शिवस्वामी कूडलसंगमवासी होता, हा एक सुखद योगायोगच होय.

बसवण्णाच्या अध्ययनातील प्रगतीसाठी आणि ईप्सित, उद्दिष्ट साध्य होण्यासाठी संगम हे अगदी आदर्श स्थळ होते. वैदिक धर्मातील बळीची प्रथा आणि कर्मकांड याऐवजी लिंगधारणेचा पुरस्कार करणारे, बहुधा शैवधर्ममताच्या कालामुख पंथाला अनुसरणारे ईशान्यगुरु हे व्यासंगी उदारमतवादी विद्वान होते. लहान बसवाच्या उदारमतवादी अनन्यसाधारण कर्तृत्वाची बीजे त्यांना दिसली. त्यांच्या समर्थ मार्गदर्शनाखाली बसवण्णाने खडतर अध्ययनात आणि आध्यात्मिक चिंतनात कांही वर्षे व्यतीत केली. त्याच्या आयुष्यातील हा कालखंड अत्यंत महत्वपूर्ण ठरला, कारण याच काळात भविष्यकाळातील त्याच्या योजनांची आखणी आणि भावी वाटचालीच्या दिशेची निश्चिती झाली.

वेद, उपनिषदे, आगम, पुराणे, काव्य तसेच अनेक धर्ममतांचा आणि तत्त्वज्ञानाचा त्याने कसून, अभ्यास केला. या साऱ्याचा त्याने चिकित्सकपणे अभ्यास केला आणि आपल्याला पटलेले विचार आणि आदर्श कृतीत उतरविण्याचा त्याच्या बंडखोर मनाने ध्यास घेतला. स्वत:च एक श्रेष्ठ भक्त असल्यामुळे शैवसंतांच्या उत्कट भक्तिगीतांचे त्याने मोठ्या जिज्ञासेने अध्ययन केले. आपल्या मनातील उत्कट भक्तिभाव अभिव्यक्त करतांना त्याच्या ठायीच्या कवित्वाचा विकास झाला. त्याच्या कवित्वशक्तीने रुप धारण केले ते वचन साहित्य प्रकाराचे.

त्याने सुमारे बारा वर्षे संगमामध्ये वास्तव्य केले असावे. त्यानंतर त्याच्या आयुष्याला एक नवी कलाटणी मिळाली. त्याचा मामा बलदेव हा कलचुर्य घराण्यातल्या बिज्जळाचा भंडारी म्हणजे कोषाध्यक्ष, कोषाधिकारी होता. आपल्या मुलीशी विवाह करण्याची त्याने बसवण्णाला गळ घातली. उदात्त आध्यात्मिक ध्येयाला वाहून घेतलेला बसवण्णा या प्रस्तावाविषयी फारसा अनुकूल नव्हता. परंतु ईशान्यगुरुनी त्याला प्रपंचात, व्यावहारिक जगात राहून, लोकांपर्यंत आपला नवा संदेश पोहोचविला पाहिजे असा उपदेश करुन त्याचे मन वळविले.

त्यानंतर बसवण्णांनी संगम सोडले आणि ते बिज्जळाची तारदवाडीची राजधानी मंगलवाडा (सध्याचे महाराष्ट्रातील पंढपुराजवळील मंगळवेढे) येथे राहावयास गेले, नागम्मा, शिवस्वामी आणि त्यांचा ८-१० वर्षांचा मुलगा चन्नबसवण्णा हेही त्याच्या बरोबर गेले. बलदेवाची मुलगी गंगाम्बिका आणि बिज्जळाची मानलेली बहीण नीलाम्बिका यांच्याशी बसवण्णा विवाहबद्ध झाला. नेमक्या कोणत्या परिस्थितीत (परिस्थितीमुळे) त्याला नीलाम्बिकेशी विवाह करावा लागला याबाबत माहिती उपलब्ध नाही. बसवण्णाला दोन पत्नी होत्या याबद्दल दुमत आढळत नाही मात्र हरिहर हा त्यांची नावे गंगाम्बिका आणि माई देवी अशी सांगतो.

मंगळवेढ्यातील दोन वर्षांच्या वास्तव्यात त्याने आपल्या गुणांच्या जोरावर अधिकारपद व प्रतिष्ठा मिळविली. बलदेवानंतर भंडारी पदासाठी अत्यंत योग्य उत्तरदायी व्यक्ती म्हणून त्याची निवड झाली.

दरम्यानच्या काळात कर्नाटकातील राजकीय परिस्थिती बदलत होती. तिसरा तैलप राज्यावर आल्यापासून कल्याणचे (सध्या बसवकल्याण म्हणून ओळखले जाणारे कर्नाटकातील बिदर जिल्ह्यातील गाव) चालुक्य निष्प्रभ ठरत होते. चालुक्यांचा केवळ एक सामंत असलेल्या बिज्जळाने परिस्थितीचा फायदा उठविला आणि चालुक्यांची गादी बळकावून कल्याणचे राज्य मिळविले. आपल्या बरोबर कल्याणला येऊन राज्याचे मंत्रिपद स्वीकारावे यासाठी त्याने बसवण्णांला गळ घातली.

बसवण्णाला राजकीय उलाढालीत रस नव्हता, वा सत्तासंपादनाची आकांक्षा नव्हती. तरीही, आपल्या जीवितध्येयाचा पाठपुरावा करण्यासाठी अनेकानेक संधी प्राप्त होतील. अशा विचाराने त्यांनी कल्याणच्या कोषाध्यक्षपदाची जबाबदारी स्वीकारली.

बहुधा इ.स. 1154 च्या सुमारास तो कल्याणला गेला आणि शिलालेखातील पुराव्यानुसार बिज्जळाची राजवट संपपर्यंत म्हणजे इ.स. 1167 पर्यंत ते तेथे होते. कल्याणमधील बारा-तेरा वर्षांच्या अल्प कारकिर्दीत त्याने केलेले कार्य उल्लेखनीय आहे.

त्यांनी धार्मिक व सामाजिक उपक्रमात स्वत:ला झोकून दिले. कूडलसंगममध्ये



पाहिलेले स्वप्न साकार करण्याचे काम त्यांनी मोठ्या उत्साहाने सुरु केले. जाती, धर्म लिंग यांचा कोणताही अडसर येऊ न देता सर्वांना धर्माची दारे खुली करण्यात आली. त्याने स्थापन केलेल्या 'अनुभवमंडप' या सामाजिक-धार्मिक विचारपीठाने देशभरातील शेकडो संतांना आणि साधकांना आकृष्ट करुन घेतले. त्यापैकी काही महत्वाच्या व्यक्ती पुढीलप्रमाणे सांगता येतील... अल्लम प्रभू, सिद्दराम, मडिवाळ माचय्या, अंबीगर चौडय्या इत्यादी कर्नाटकातून आलेले लोक, महाराष्ट्रातील उरीलिंगदेव, बहुरुपी चौडय्या, आंध्र प्रदेशातील सकलेश मादरस; सौराष्ट्रातील सौद्रल बाचरस, काश्मीरचे मोळीगेय मारय्या व त्याची पत्नी महादेवम्मा.

आता धर्म जनजागृतीच्या मौलिक कामाचा प्रेरणास्रोत बनला. धर्माच्या इतिहासात पूर्वी कधीही एवढी झळाळी आणि अद्‌भुत सामर्थ्य धर्माला प्राप्त झाले नव्हते. बसवेश्वरांनी अनेक चमत्कार केले असे म्हटले जाते; परंतु सर्वसामान्य आणि जातिबहिष्कृत लोकांना आध्यात्मिक साक्षात्काराच्या उंचीवर पोहोचविणे हा त्यांचा सर्वात मोठा चमत्कार मानावा लागेल.

त्यांच्या बंडखोर विचारांनी आणि धर्मप्रसाराच्या कार्याने सनातन्यांच्या मनात खळबळ माजविली. त्यांना विरोध करण्यासाठी ते संघटित झाले. बिज्जलाच्या नजरेतून तो उतरावे म्हणून सनातन्यांनी त्याच्यावर अनेक दोषारोप केले, कंड्या पिकविल्या. आपल्या अनुयायांच्या निर्वाहासाठी बसवेश्वर राज्याच्या तिजोरीतील पैशाचा गैरवापर करतात असा त्यांच्यावर दोषारोप करण्यात आला. बसवेश्वरांनी जेव्हा राजापुढे सर्व जमाखर्च सादर केला तेव्हा हा आरोप बिनबुडाचा आणि चारित्र्य हननासाठी केलेला कट असल्याचे सिद्ध झाले.

हिमालयवत अडथळ्यांवर आपल्या प्रभावाने मात करीत त्यांनी आपले कार्य अधिक जोमाने चालू ठेवले. वीरशैव होण्यापूर्वी ब्राह्मण म्हणविल्या जाणाऱ्या मधुवरसाची मुलगी आणि पूर्वी अस्पृश्य मानला गेलेल्या हरळय्याचा मुलगा यांचा विवाह ही त्यांच्या सामाजिक धार्मिक कार्याची परिणती होती. सनातन्यांच्या मते तो धर्म बुडविणारा वर्णसंकर होता. त्यामुळे त्यांनी संतापून आणि चिडून जाऊन त्याविरुद्ध गदारोळ माजविला. त्यांनी बसवण्णा आणि त्यांच्या अनुयायांविरुद्ध वर्णधर्माचा संरक्षक मानला जाणाऱ्या राजाकडे तक्रार केली.

परंतु, बसवण्णांनी तथाकथित वर्णव्यवस्थेची मुळीच पर्वा केली नाही. किंबहुना वर्ण विभागणीचे निर्मूलन करण्यासाठी त्यांनी आयुष्यभर लढा दिला. त्याच्या दृष्टीने, वर निर्देशिलेला विवाह योग्यच होता. त्याच्या युक्तिवादानुसार शरण सांप्रदायिक झाल्यावर मधुवरस ब्राह्मण राहिला नाही आणि हरळय्या अस्पृश्य राहिला नाही.

लिंगधारणेनंतर वर्णाच्या पलीकडे जाऊन ते शरण सांप्रदायिक बनले. आपण गांधीयुगानंतरच्या काळातील असल्यामुळे या विचारामागची कारणमीमांसा समजून घेणे

आज शक्य आहे. बाराव्या शतकातील समाजाला मात्र इतका मूलगामी विचार सहन झाला नाही. या संदर्भात, बसवण्णा आपल्या काळाच्या पुढे आठ शतके होता, असे म्हणता येईल.

बसवण्णांचे विरोधक अधिक प्रबळ झाले. बिज्जळाला स्वार्थी हितसंबंधियांच्या रेट्यापुढे झुकावे लागले. निरपराध मधुवरस व हरळय्यावर निर्घृण कारवाई करण्यात आली. त्या दोघांना साखळदंडाने बांधून हत्तीच्या पायाखाली देऊन त्यांची हत्या करण्यात आली.

या निर्घृण कृत्याने शरण सांप्रदायिकांना जबर धक्का बसला. त्यातील काहीजण संतापाने व अभिनिवेषाने सूडाची भाषा बोलू लागले. बिज्जळाने चालुक्याची गादी बळकाविल्यामुळे लोकांमध्ये जी एक सुप्त विरोधाची भावना होती, ती आता सार्वत्रिक, प्रबळ बनली आणि बिज्जळाच्या हितशत्रूंनी या परिस्थितीचा फायदा उठविला. बिज्जळाचा काटा काढून चालुक्याची गादी बळकाविण्याच्या इच्छेने बिज्जलाचा धाकटा भाऊ मल्लगी उर्फ मल्लिकार्जून वनवासीप्रमुख कस्यपाला जाऊन मिळाला. रायमुरारी सोवीदेव, संकम आणि सिंधण ही बिज्जळाची मुलेही गादीसाठी भांडू लागली. हे सर्व संधीची वाट पाहात होते. जेव्हा धार्मिक अराजक माजले तेव्हा काटकारस्थान रचले गेले. आणि बहुधा राजकीय विरोधकांकडून बिज्जळाचा वध झाला. पण त्याचे खापर मात्र शरणांच्यावर फोडण्यात आले.

कल्याणमध्ये अशाप्रकारची दुष्ट कृत्ये घडत होती तेव्हा बसवण्णा काय करीत होते? तो जर त्यावेळी कल्याणमध्ये असता तर अशा प्रकारच्या घटना घडल्याच नसत्या. हरळय्या आणि मधुवरसाला ठोठावलेली देहान्ताची शिक्षा त्यांनी स्वत: सोसली असती. इतक्या वेगाने सारे घडेल असे त्यांच्या ध्यानीमनी नव्हते. धुमश्चक्रीपासून दूर राहून शांततेत काळ व्यतीत करण्यासाठी ते काही दिवस कूडलसंगमला जाऊन राहिले होते, या म्हणण्यात तथ्य आहे. पण घटना इतक्या वेगाने चिघळत गेल्या की सारे त्यांच्या हाताबाहेर गेले आणि ते परिस्थितीच्या षड्यंत्राचा बळी ठरले.

शरण सांप्रदायिकांनी कल्याण सोडले आणि ते चहू दिशांना पांगले. गंगाबिका, नागम्मा, शिवस्वामी इत्यादींचा एक मोठा गट चन्नबसवणाच्या अधिपत्याखाली उत्तर कर्नाटकातील गोकर्णाजवळच्या उळवी गावी गेला. नीलांबिका बसवण्णाचा शिष्योत्तम अप्पण्णा बरोबर बसवण्णाच्या अखेरच्या दिवसापर्यंत त्याच्याबरोबर राहाण्यासाठी कूडलसंगमला गेली.

बसवेश्वर केवळ एक समाजसुधारक नव्हते तर ते एक प्रेषित आणि श्रेष्ठ आध्यात्मिक पुरुष होते. त्यामुळे वरील सर्व घडत असतानाही त्यांनी आपल्या आध्यात्मिक साधनेत खंड पडू दिला नाही. आपले जीवितकार्य पूर्ण झाले आहे,



तेव्हा ज्याच्या आज्ञेने आपण ईश्वरी इच्छाशक्तीचे साधन बनलो त्या संगमेश्वराकडे परत गेले पाहिजे असे त्यांना वाटले. इ.स.1167 मध्ये म्हणजे वयाच्या केवळ छत्तीसाव्या वर्षी त्यांना लिंगांग सामरस्य लाभले, संगमेश्वराशी ते एकरुप झाले. हा झाला बसवण्णांच्या आयुष्यक्रमाचा औपचारिक आढावा. परंतु, संतांचे आणि प्रेषितांचे खरे चरित्र म्हणजे त्यांच्या आंतरिक शक्तीच्या उत्क्रांतीचा, विकासाचा इतिहास, त्यांची आंतर्दृष्टी तसेच त्यांना झालेला ईश्वरी शक्तीचा साक्षात्कार आणि त्यांनी अंगिकारलेले कार्य होय. पुढील प्रकरणातून बसवेश्वराच्या या पैलूंचे आकलन करुन घेण्याचा प्रयत्न करु.

## 2

# भक्ति - भंडारी

बसवण्णांनी एक अत्यंत कार्यक्षम भंडारी, राज्याचा कोषाध्यक्ष म्हणून नावलौकिक मिळविला आणि त्याचबरोबर ते कल्याणचा राजा बिज्जल ह्याच्या आदरास प्राप्त झाले. ते आध्यात्मिक साधनेच्या राज्यातील भक्तिभंडारी होते; भक्तीच्या अमूल्य खजिन्याचे रखवालदार होते.

'शरण' सांप्रदायिकांमध्ये विविध पैलू आसलेल्या व्यक्ती आढळतात. 'अल्लम प्रभूंच्या धाडशी वृत्तीवर ज्ञानाचे नियंत्रण होते, त्यांचा दृष्टिकोण मूलगामी असे आणि ते संन्यस्तपणे विरक्तीचे जीवन जगले. चन्नबसवण्णांच्या ठिकाणी धारदार बुद्धिमत्ता आणि गाढ विद्वता होती. सिद्दरामांनी मुख्यत: स्वकार्याला व नि:स्वार्थ सेवेला वाहून घेतले होते. त्याचप्रमाणे अक्कमहादेवी, मडिवाळ माचय्या अशा शरणांना स्वत:चे असे लक्षणीय व्यक्तिमत्व होते. त्या सर्वांत बसवेश्वर मूर्तिमंत भक्तीचे प्रतीक म्हणून ओळखले जात.

चन्नबसवण्णाने त्यांचे वर्णन 'बसव' म्हणजे भरघोस हंगाम, भक्तीचा फुललेला बहर असे केले आहे; तर सिद्दरामाने त्याचे वर्णन करताना 'बसव' म्हणजे मूर्तिमंत भक्ती, मूर्तिमंत आनंद असे उद्‌गार काढले आहेत. मडिवाळ माचय्याने आपल्या एका वचनामध्ये सूचकपणे म्हटले आहे,

*तुम्ही कसेही पाहा,*<br>
*बसवण्णा वेल आहे,*<br>
*तुम्ही स्पर्श करता,*<br>
*आणि लिंगाचा घोस उमलतो*<br>
*तुम्ही घोस पकडता, आणि अहा,*<br>
*त्यातून भक्तिरस स्रवू लागतो.*

बसवण्णांच्या वचनांना कोठेंही दाबले तरी भक्तिरस स्रवू लागतो. सुदैवाने, त्यांची हजारेक वचने आज आपल्याला उपलब्ध आहेत.

असामान्य मन असणाऱ्यांपैकी एका प्रज्ञावंताच्या आध्यात्मिक प्रवासातील अनुभवस्मृतींचा खजिना म्हणजे जणू ही वचने होत. उत्कट आंतरिक तळमळीपासून



ते साक्षात्कार झाल्यावर प्राप्त होणाऱ्या निरामय शांततेच्या प्रतीतीपर्यंतच्या आध्यात्मिक अनुभवांच्या सर्व टप्प्यांचा समर्थ आविष्कार त्याच्या वचनात आढळतो. ही वचने म्हणजे साधकांच्यासाठीचा भक्तिमार्गप्रदीप होय.

नारदीय भक्तिसूत्रामध्ये भक्तीला प्रेमाची सर्वोच्च अवस्था म्हणून संबोधले आहे. ईश्वरावरील अविचल आणि नि:स्वार्थ प्रेम म्हणजे भक्ती. परंतु, जोपर्यंत आपण दृष्यमान लौकिक वस्तूंपासून सुख व समाधान मिळवितो तो पर्यंत अदृश्य अशा दैवी शक्तीच्या वाटेकडे आपण वळू शकत नाही. दैनंदिन जीवनातील क्षणभंगुर सुखाच्यामागे आपण धावत सुटतो. ज्याची आपल्याला तीव्र लालसा असते तेवढेच आपण प्राप्त करु शकतो. परंतु, आत्म्याला असलेली शाश्वताची (चिरंतनाची) ओढ ज्यांना जाणवते, ते लोक भौतिक सुखापलीकडचे काहीतरी मिळविण्यासाठी धडपडतात. दैवी असमाधान म्हणजे भक्तिमार्गावरील पहिले पाऊल होय.

बसवेश्वराच्या आध्यात्मिक प्रवासाच्या प्रारंभीच्या टप्प्यावरील अशा आध्यात्मिक असमाधानाचे प्रभावी प्रकटीकरण त्याच्या काही वचनांमध्ये आढळते.

*परमेश्वरा या जगाने*<br>
*मायेच्या विळख्यात मला जखडले आहे.*<br>
*वाचव, देवा मला सोडव*<br>
*सारे श्रेय हरपले, नि:शेष झाले*<br>
*दयाधना देवा, दया कर*<br>
*कूडलसंगमा*

आपली तगमग व्यक्त करतांना ते पुढे लिहितात, 'लौकिक जगाच्या राहूने मला ग्रासले आहे. मला खग्रास ग्रहण लागले आहे. नागाच्या फण्याखालच्या बेडकासारखी माझी अवस्था आहे. इंद्रियसंवेदनारुपी पाच फड्यांच्या संसारसर्पाने मला दंश केला आहे. माझे मन माझ्या ताब्यात नाही. ते फांदीवरच्या एखाद्या माकडासारखे सैरावैरा धावते आहे; सैरभर झाले आहे.

*माझ्या मनी एक विचार, मायेच्या दुसराच मनी*<br>
*माझी ओढ एकीकडे, ती ओढे भलतीकडे*<br>
*ती ग्रस्त करी, संत्रस्त करी*<br>
*ठायी ठायी छळवाद करी.*<br>
*कूडलसंगमदेवाच्या भेटीची आस लागता*<br>
*माझ्या वाटेवर अंधार पसरी*<br>
*मायावी माया*

सुखाच्या उन्मादात मी अमर्याद दु:खाला सामोरा जातो आहे. माझ्या हृदयात डोकावू नका. ते एखाद्या उंबरासारखे आहे. तुपासाठी तरवारीचे धारदार (तळपते)

पाय चाटणाऱ्या कुत्र्यासारखे माझे जीवन आहे. मी जणू दलदलीत फसलेला पशू आहे. हे कूडलसंगमदेवा, मी आक्रंदतो आहे, तू माझ्या हाकेला ओ देशील ना?

*हाय रे हाय ! शिवा*
*तुला ना दया*
*हाय रे हाय! शिवा*
*तुला ना करुणा*
*का घातले जन्मासी?*
*सोसाया इहलोकीच्या कळा*
*पार नाही दुःखासी.*
*पारुखे स्वर्गासी*
*का घातले जन्मासी?*
*अगा, कूडलसंगमा*
*या परते का न घातिले*
*झाडा झुडुपाच्या वंशी?*

"झाडांचा जन्मही माझ्यापेक्षा चांगला नाही काय ? निदान ती वाटसरुंना सावली तरी देतात" अशा शब्दांतून बसवण्णा साधकाच्या अंतरीची तीव्र वेदना अभिव्यक्त करतो. ईश्वराशी दृढसंबंध प्रस्थापित करण्याची (साक्षात्काराची) निकड त्याला जाणवत होती पण त्याच बरोबर आपल्या मर्यादांची दुःखद जाणीवही त्याला होती. तथापि, तो निराश झाला नाही. आध्यात्मिक वाटचालीतील ही अगदी प्रारंभिक अवस्था आहे, हे तो जाणून होता. पाश्चिमात्य गूढवादी (साधक) ज्याला 'आत्म्याची अंधारी रात्र' (द डार्क नाईट ऑफ द सोल') म्हणतात त्या अवस्थेतून तो यशस्वीपणे बाहेर पडतो आणि एक पायरी पुढे जाऊन म्हणतो,

*मर्त्य जग ही केवळ टांकसाळ*
*इथे मूल्यवान बनतात, ते तिथेही मूल्यवान*
*जे इथे काही संपादित नाहीत, ते तिथेही तसेच*
*हे कूडलसंगमदेवा.*

आता त्याची श्रद्धा तावून सुलाखून निघाली आहे आणि आध्यात्मिक परिपूर्तीच्या तेजाने तळपू लागली आहे. गुरुकृपेमुळे त्याला आपल्या अंतिम जिवितध्येयाचे ज्ञान होते आणि त्याप्रत पोहोचण्याचा मार्गही सापडतो. अनन्यशरणभावाने तो ईश्वराजवळ आसरा मागतो.

*तुम्ही माझे बाप । तुम्हीच माझी माय ।*
*आप्तेष्ट गोतावळा । तुम्ही देवा ।*
*कोणी सगा सोयरा । नाही तुम्हाविण ।*



*मर्जीप्रमाणे ठेवी मला । हे कूडलसंगमदेवा ।*

वैष्णव सांप्रदायिक ज्याला प्रपत्ती आणि शरणागती म्हणतात, त्या प्रकारचे हे अतुलनीय अजोड प्रेम आणि संपूर्ण शरणागतीची ही भावना त्याला ईश्वरी इच्छेचे साधन बनविते. आपले स्वतःचे म्हणता येईल, असे त्याच्याजवळ काही उरत नाही.

*माझी सुखदुःखे, तुमची देवा ।*
*यशापयशही तुमचे हो ।*
*सन्मान - अवमानही तुमचे ।*
*अगा कूडलसंगमदेवा ।*
*वेलीस फळाचे ओझे कैचे ?*

अशाप्रकारे स्वतःला देवाला समर्पित करुन तो चित्ताच्या तळमळीवर, तगमगीवर मात करतो. आता अगदी शांत, निश्चिंत मनाने तो ईश्वरीकृपेच्या सामर्थ्याचे स्तवन करु शकतो.

*देवा तुवा इच्छिले तर, ओडक्यास कोंभ येईल*
*देवा तू इच्छिले तर, भाकड गाय दूध देईल ।*
*देवा तू इच्छिले तर, विषही अमृत होईल ।*
*देवा तू इच्छिले तर, सकल वस्तुमात्र आज्ञा पाळील ।*
*बा, कूडलसंगमदेवा ।*

जगातील प्रत्येक वस्तुमात्रामध्ये तो आता ईश्वरी सामर्थ्य पाहू शकतो. 'अहं' भाव विसर्जित करुन ईश्वरीकृपेसाठी तो आपल्या अंतःकरणाची दारे खुली करतो.

'अहं' भावाचे निर्मूलन ही भक्तिमार्गावरील एक अत्यावश्यक पायरी आहे. प्रत्येक पायरीशी आपण 'मी' आणि 'माझे' चे अडथळे तयार करीत असतो. संकुचित 'मी' नष्ट झाल्यानंतरच अमर्याद अथवा विश्वात्मक 'मी' अवतरतो. अहंभाव म्हणजे हजार फण्याचा विषारी नाग. तो आपल्या फण्या उभारतो तो संपत्ती, दारिद्र्य, सत्ता, वर्णश्रेष्ठत्वाचा अभिमान एवढेच नव्हे तर ज्ञानाभिमान यांच्या रुपात साधकाने हा अहंकार जेव्हा केव्हा आणि ज्या कोणत्या स्वरुपात दिसेल तेव्हा त्याची मान पकडून छाटून टाकली पाहिजे.

आपल्याला बसवण्णात प्रत्येक पातळीवर अखंड सावधानता दिसते. खरे तर, अहंकार कुरवाळला जावा आणि गर्वाला खतपाणी मिळावे अशी त्याची एकूण परिस्थिती होती. पण या साऱ्यावर त्याने मात केली.

*ती मधुर आम्रफले, मी क्षुद्र रानफळ*
*तुझ्या शरणांपुढे भक्त म्हणवून घेणे*
*संकोच वाटल्याशिवाय मला कसे शक्य!*
*कूडल संगाच्या शरणांपुढे,*

*मज भक्ताचा काय पाड?*

शरणांच्या कृपेमुळेच आपल्या मनात परमेश्वराबद्दल प्रीती निर्माण झाली हे तो कोणताही आडपडदा न ठेवता मान्य करतो. आपल्या एका वचनात तो म्हणतो, 'माझ्यापेक्षा क्षुद्र कोणी? छे! कोणीच नाही. शिवभक्ताहून थोर कोणी? छे! कोणीच नाही.'

निव्वळ जातीच्या आधारे व्यक्तीची सामाजिक प्रतिष्ठा ज्याकाळी ठरविली जात असे त्याकाळी जातीचा आणि वर्णाचा अभिमान टाकून देणे ही बाब फार अवघड होती. बसवेश्वराने मात्र आपल्या जातीचा अभिमान टाकून दिला. तो म्हणतो.

*देवा, लावू नको साहण्यास धक्का*
*श्रेष्ठ जातीत जन्म घेतल्याचा!*

जातीच्या उतरंडीतील सर्वात अध:स्तरावरील अस्पृश्य मानले जाणारे मादार कन्नया, ढोर कक्कय्य आणि आपण एकच आहो असे तो मानीत असे. अशा रीतीने बसवण्णाने आपला सूक्ष्म मीपणा, धूर्त अहंकार मुळापासून उखडून टाकला.

अहंकाराच्या निरासाबरोबरच भक्तिमार्गामध्ये कितीही बिकट परिस्थिती आली तरी तिच्यावर मात करुन वाटचाल करण्याचा व्रतनिश्चय असावा लागतो.

*अग्नीचा लोळ येवो*
*की संपत्तीचा ओघ*
*मी नाही म्हणणार*
*मज हवे, मज नको.*

हीच खरी नैष्ठिक भक्ती, अथवा भक्तीबद्दलची निग्रही कळकळ होय. षट्स्थळातील सहा अवस्थांपैकी दुसऱ्या टप्प्यावर निर्देशिलेली माहेश्वरस्थळातील ही नैष्ठिक भक्ती आत्मज्ञानाचा मार्ग दाखविते, अशी वीरशैवपंथाची धारणा बसवण्णासह सर्व शरणांनी अनुसरली. भक्त, महेश, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य या आध्यात्मिक साधनेच्या सहा अवस्था आहेत. ईश्वराच्या भेटीच्या तळमळीपासून ते 'अहं ब्रह्मस्मि' च्या जाणिवेनंतर येणाऱ्या सर्वमंगल आणि शांत अवस्थेपर्यंत पोहोचताना भक्त ज्या प्रकारच्या मानसिक अवस्थांतून जातो त्या या अवस्था होत.

षट्स्थलदर्शनानुसार, भक्ती सतत उत्क्रांत होत जाते आणि जगत्परिमाण धारण करते. भक्तस्थळामध्ये श्रद्धाभक्तीचे म्हणजे अनन्यशरण श्रद्धेचे विवेचन आहे. ती महेशस्थलातील नैष्ठिक म्हणजेच अविचल भक्तीत, पुढे प्रसादीस्थलातील अवधान[1] भक्तीत, प्राणलिंगीतील अनुभव[2] भक्तीत, शरणस्थलातील आनंद[3] भक्तीत आणि अंतिमत:ऐक्य[4] स्थलातील समरस[5] भक्तीत उत्क्रांत होत जाते. भक्त[6] आणि भक्ती[7]

1जागरुकता 2 ईश्वराचा अनुभव 3कल्याण 4जिवाशिवाचे ऐक्य 5ईश्वराचे आणि आत्म्याचे ऐक्य 6साधक 7साधना.



यांच्या क्रमाने उत्क्रांत होत जाण्याच्या या संकल्पनेचे मार्मिक विवेचन षट्स्थलामध्ये केले आहे. तथापि, त्याचे विवेचन प्रस्तुत प्रकरणातील आढाव्याच्या कक्षेत येत नाही.

महेश्वरस्थळाच्या अवस्थेत बसवण्णा श्रद्धेचा अविचलपणा प्राप्त करतो. सारी अशुद्धे जळून गेल्यामुळे त्याच्या भक्तीतून जगत्व्यापी ईश्वरेच्छा प्रकट होऊ लागते. आणि ती विश्वव्यापक बनते. सुखाप्रमाणेच दु:खाचेही तो शिवकृपा म्हणून समत्व भावाने स्वागत करतो. शिव आपल्या भक्तांची अनेक प्रकारे कसोटी पाहात असतो आणि सत्व परीक्षा घेत असतो, हे तो जाणून असतो.

*कशी व्यक्ती करू तुझ्यावरील श्रद्धा?*
*कशी व्यक्त करु तुझ्यावरील प्रीती ?*
*विकले आहे मी मला तुझ्यापायी*
*तनाची कसोटी पाहिलीस*
*मना हिंदकळवलेस*
*धन हरवून नेलेस*
*या सर्व कठोर परीक्षेतही*
*मी अविचल राहिलो, तेव्हा*
*आमच्या कूडलसंगमदेवाला*
*करुणेचे भरते आले.*

भक्तीचा मार्ग हा ईश्वरापर्यंत पोहोचण्याचा सर्वात सोपा मार्ग आहे, असे म्हणतात. पण दुसऱ्या बाजूने पाहिले तर तो अत्यंत कठीण मार्ग आहे. 'तुम्ही नैष्ठिक भक्ती करू शकत नाही कारण ती निग्रही, निश्चल भक्ती असल्यामुळे एखाद्या करवतीप्रमाणे मागेपुढे कापत जाते' असे बसवेश्वर म्हणतो. बसवेश्वराच्या ठायी अशी अनन्य भक्ती होती म्हणूनच शिवाच्या पायाशी आपली संपूर्ण प्रीती अर्पण करुन अध्यात्माच्या मार्गावर यशस्वी वाटचाल करु शकला.

ही प्रीती मूलत: अलौकिक असते आणि तिला 'मी' आणि 'माझे' यांच्या मर्यादा नसतात. परंतु ही प्रीती शब्दातून अभिव्यक्त करताना मात्र भक्त ती ईश्वराबरोबरच्या अनेक ऐहिक नात्यांमधून व्यक्त करतो. या दृष्टिकोणातून दास्य (सेवावृत्ती), सख्य (मैत्रभाव), वात्सल्य (वत्सल भाव), माधुर्य (पत्नीची प्रीती) आणि शांत (सात्विक भाव) असे भक्तीचे पाच प्रकार सांगितले जातात.

यातील काही भाववृत्तीचे बसवण्णाने अत्युत्कृष्ट चित्रण केले आहे. अर्थात, इतर शरणांप्रमाणे तो सुद्धा विशिष्ट समूर्त रुपाऐवजी त्याच्या चित्रणात निराकारतेला महत्व देतो. 'कुरुहू' म्हणजे, लिंगप्रतिमेची पूजा करुन शरण 'अरुहू' म्हणजे, ईश्वरी चैतन्याप्रत जाण्याची तळमळ व्यक्त करीत आणि 'कुरुहू'च्या वरची पातळी प्राप्त करुन घेत. म्हणून ते या दोन भाववृत्तींमध्ये फारसा काटेकोर भेद करीत नाहीत.

तथापि, पुरंदरदास आणि अन्य भक्तांनी रचलेल्या दाससाहित्यात या भाववृत्तींचे बारकावे तपशीलाने चित्रित झाले आहेत. अक्कमहादेवी, सिद्‌राम, उरीलिंगदेव आणि खुद्‌ बसवण्णानेही यांपैकी काही भाववृत्ती अनुभवल्या.

एखाद्या कर्तव्यदक्ष चाकराप्रमाणे अथवा पतिपरायण पत्नीप्रमाणे बसव कूडलसंगमेश्वराला अनन्यभावाने शरण जातो. पुढील वचनात तो स्वत:ला एकनिष्ठ चाकर म्हणवून घेतो.

*सैनिक पळपुटा निघाला,*
*त्याची लाज मालकाला;*
*हे कूडल संगमदेवा,*
*तन-मन-धनाबाबत अंगचोरपणा न करता*
*मला लढायला, जिंकायला प्रवृत्त कर...*

'सैनिक रणांगणावरुन पळून आला तर ते त्याच्या धन्याचे नुकसान असते. इथे, तू माझा धनी आणि मी तुझा चाकर. जीवनाच्या लढाईत पराभूत झाल्यामुळे जर मी त्याकडे पाठ फिरवून पळत असेन तर तो तुझा अपमान आहे. तेव्हा, मला झुंजायला आणि जिंकायला प्रवृत्त कर असे तो विनवितो.'

सती-पती भाव-- पत्नीची प्रीती ही कूडल संगमेश्वराविषयीची उत्कट समर्पण वृत्ती व्यक्त करणारी आणखी एक भाववृत्ती होय.

*मी जणू काय,*
*हळदीने न्हालेली*
*सोन्याने सजलेली*
*पण पतिप्रेम गमावलेली,*
*स्त्री आहे. अंगाला राख फासली*
*माळा गळ्यात घातल्या*
*पण तुझ्या प्रेमाला दुरावलो,*
*असा मी अभागी.*
*पापात रुतून बसला*
*तरीही जगत राहिला*
*असा मजसारखा*
*कुळात दुसरा कोणी नसेल.*
*तवकृपेचे अभय दे मला*
*अगा कूडलसंगमदेवा.*

शरण बनून, पत्नीच्या भूमिकेतून तो ईश्वराची, लिंगाची प्रार्थना करतो. ही शरण-सती, आणि लिंगपती वृत्ती शरणांच्या आध्यात्मिक साधनेच्या मार्गात महत्त्वाचे कार्य करताना दिसते.



वर विशद केलेल्या भक्तीच्या पाच प्रकारांखेरीज (पंचविधा भक्तीखेरीज) श्रवणभक्ती, कीर्तनभक्ती, स्मरणभक्ती अशी नवविधा भक्तीही सांगितली जाते. ईश्वराचे गुणसंकीर्तन ऐकून, त्याची स्तुतिस्तोत्रे गाऊन भक्त आपले आध्यात्मिक सामर्थ्य विकसित करीत असतो. बसवण्णाच्या काही वचनांमध्ये या साऱ्याचे परिणामकारक चित्रण आहे.

शिवाय, बसवण्णाने अनुसरलेल्या षट्स्थल मार्गावर, भक्तीच्या उत्क्रांतीचे सहा टप्पे पार करण्यासाठी मदत म्हणून अष्टवर्ण म्हणजेच गुरु, लिंग, जंगम, प्रसाद पादुका, विभूती, रुद्राक्ष आणि मंत्र अशा आठ साह्यभूत बाबी असतात.

या अष्टवर्णांचा अवलंब करण्याच्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण रीतीमुळे ते अंत:शुद्धीचे महत्त्वपूर्ण प्रतीक बनले आणि त्याच्या ईश्वरप्राप्तीच्या मार्गक्रमणातील अभेद्य कवच ठरले. गुरु, लिंग आणि जंगम यांना त्यांनी आपले अनुक्रमे तन, मन,धन अर्पण केले. यालाच त्रिविध-दासोह म्हणजे त्रिविध उपासना म्हणतात.

आपल्या शेकडो वचनांमधून त्यांनी गुरु,लिंग, जंगम या ऐहिक संकल्पनांचे आणि त्यांच्या विशिष्ट धर्माच्या सर्व मर्यादा उल्लंघून पलीकडे जाण्याच्या परिमाणाचे मोठ्या सूचकतेने वर्णन केले आहे. त्यांच्या भक्तीच्या या श्रेष्ठ पैलूचा अधिक अभ्यास होणे गरजेचे आहे. याला जोडून असे म्हणता येईल की, त्यांची ईश्वरावरील प्रीती इतकी उत्कट, सहजस्फूर्त आणि ओसंडून वाहणारी आहे की ती, प्रसादी आणि प्राणलिंगी या अवस्था सहजी पार करुन त्यांना शरणस्थलापर्यंत घेऊन जाते.

इथे, या टप्प्यावर भक्ताच्या मनाची तगमग संपूर्णपणे थांबते, निरस्त होते आणि तो आनंदाने गाऊ लागतो.

*रसना तुझ्या नामसुधेने परिप्लुत*
*नेत्रात तुझीच प्रतिमा फक्त*
*मनात तुझेच विचार केवळ*
*आणि कानात तुझ्या स्तुति- स्तोत्राचे गुंजन.*
*अगा, देवा कुडलसंगमा,*
*तुझ्या चरणारविंदी मी मधुमिलिंद*
*तुझ्यातच विलीन, एकाकार.*

समरसप्रेमाच्या, एकरुपतेच्या परिदृष्टीमुळे त्याचे संपूर्णपणे विश्वमानवात रुपांतर होते. तो आता ईश्वराच्या हातातील छेडण्यास सज्ज असलेली वीणा बनतो. तरीही, त्याला संपूर्ण समाधान लाभत नाही, मग तो एक पायरी पुढे जातो.

*नाच-नाचून माझे पाय थकत नाहीत*
*टक लावून पाहून डोळे शिणत नाहीत*

*गुणगान करताना जीभ दमत नाही,*
*आणखी काय हवे? हवे तरी काय?*
*दोन्ही हातांनी भरभरुन पूजा करताना*
*माझे हृदय दमत नाही.*
*आणखी काय हवे? हवे तरी काय?*
*परिसा कूडलसंगमदेवा,*
*एकरुप होण्याची तळमळ एवढी की,*
*वाटते, तुझे पोट फोडून*
*आत प्रवेश करावा*

शेवटची ओळ अन्वर्थक आहे. ईश्वरी शक्तीचा खोल ठाव घेण्याची आणि स्वत:च कूडल संगम होण्याची त्याला उत्कंठा लागते. भक्त आणि ईश्वर एकरुप होतात, त्यांच्यातील द्वैत सरते तेव्हा आत्मिक ऐक्य घडून येते.

ही भक्तीची अंतिम अवस्था- ऐक्य स्थळ. इथे तो थेटपणे आणि अंत:प्रेरणेने ईश्वराला जाणल्याचा अनुभव घेतो. हेच आध्यात्मिक प्रवासातील परमोच्च प्राप्य म्हणजेच अंग आणि लिंग यांची एकरुपता किंवा लिंगांग सामरस्य होय. तो चिरंतनाशी पूर्णपणे एकरुप होतो, साऱ्या ब्रह्मांडाला व्यापून राहातो. भक्तीत विरघळून जाऊन तो स्वत: भक्तीचे मूर्तिमंत प्रतीक बनतो. "भक्तीने पाठलाग करुन मला गिळंकृत केले' असे उद्‌गारतो. त्याने प्राप्त केलेल्या परमसिद्धावस्थेचे चित्र पुढील वचनांमधून उत्कृष्ट रीतीने उभे राहाते.

*श्रद्धेच्या भूमीत । गुरुकृपेचे बीज अंकुरले ।*
*लिंगाची पालवी फुटली । विचाराची फुले फुलली ।*
*कृतीची कोमल फळे आली । त्यांना ज्ञानाने पक्वता आली ।*
*ज्ञानाचे फळ पिकले । देठापासून तुटून खाली पडले ।*
*तुला आवडले, हवे म्हणून । तू ते लगोलग उचलले ।*
*पहा कूडलसंगमा ।*

फळाप्रमाणे परिपक्व होऊन बसवण्णा स्वत:ला कूडसंगमाच्या चरणी समर्पित करतो. कूडल संगम स्वत: आपलाच अंश असलेले ते फळ उचलून हलकेच आपल्या हृदयात ठेवतो.

अशाप्रकारे वीरशैवपंथाला अनुसरुन द्वैतापासून सुरुवात करुन तो अद्वैतात पूर्णत्व प्राप्त करुन घेतो. इथे, पुरंदरदास, कनकदास यांच्यासारख्या दासपरंपरेतील द्वैती भक्तांची भक्ती आणि अद्वैताला प्रमाण मानणारी शरणांची षट्स्थलपद्धती यातील फरक स्पष्टपणे दिसून येतो. पुरंदरदास अगदी अखेरीसही हरीहून भिन्न अशा परमानंदाचा अनुभव घेऊ शकला. बसवण्णाच्या बाबतीत मात्र सुरुवातीला द्वैतभाव आढळला तरी पुढे भक्त आणि भक्ती, साधक आणि ईश्वर असे वेगळेपण रहात नाही. तो स्वत:च परमानंदस्वरुप अथवा ईश्वर होतो. भक्ती भक्त आणि ईश्वर एकरुप होतात.



हे केवळ द्वैत - अद्वैताच्या मिलाफाचेच नव्हे तर; भक्ती, ज्ञान आणि कर्म यांच्याही मिलाफाचे उत्कृष्ट उदाहरण आहे. बसवण्णामध्ये असलेली भावनेची उत्कटता ही त्याची तत्वज्ञात्मक आंतर्दृष्टी आणि अखिल मानवजातीविषयी त्यांना असलेली प्रगाढ करुणा यांच्याशी संयोग पावते. आपल्या सुनिश्चित उद्दिष्टाकडे ती अत्यंत संयमाने प्रौढपणे वाटचाल करते कारण ती प्रगल्भ आहे आणि प्रज्ञेच्या प्रकाशात तिची भावनाशीलता शुद्ध झालेली आहे. ज्याप्रमाणे नदी समुद्राला मिळते आणि स्वत:च समुद्र बनते, त्याप्रमाणे त्यांची भक्ती कूडलसंगमाशी एकरुप होते आणि प्रत्यक्ष कूडलसंगम बनते.

याला तो अंतिम नि:स्तब्ध शांततेची अवस्था म्हणतो. विश्वात्म्याशी जडणाऱ्या संबंधाचे मन आकलन करु शकत नाही, शब्द तिथपर्यंत पोहोचू शकत नाहीत, असे उपनिषदांनी म्हटले आहे. बसवेश्वराने मोठ्या प्रयत्नपूर्वक ही उदात्त अवस्था शब्दबद्ध केली आहे.

*उर्वरित, अंतिम सत् पहा*
*सारा काळोख नष्ट झाला आहे*
*तेज प्रकाशसिंहासनी अधिष्ठित आहे*
*कूडल संगमेश्वरालाच केवळ ठावे,*
*ही लिंगैक्याची पहाट आहे.*

तेज तेजात मिसळून जाते आणि अंतिमत: उरते ते केवळ तेजच!

# 3
# बंडखोर संत

आध्यात्मिक साधनेच्या काळात बसवेश्वराने लिहिलेली वचने म्हणजे त्याच्या साक्षात्कारी अनुभवांचा जिवंत दस्तऐवज आहे, तसेच ती अत्युच्च पातळीवरील आत्मज्ञानप्राप्तीसाठी उपयुक्त ठरावी अशी आचारसंहिता आहे. ही वचने म्हणजे केवळ बौद्धिक पातळीवर विणलेली विचारप्रणाली नव्हे अथवा नीरस, शुष्क अशी विद्वत्ताप्रचुर तत्त्वप्रणाली नव्हे. ईश्वरीय धर्मग्रंथाप्रमाणे ती प्रेमपूरित व सुनिश्चित उद्दिष्ट असलेली, ईश्वरी कृपेचे संपूर्ण सत्य उलगडणारी त्याची वचने आचार आणि विचारातील एकमेळ प्रकट करतात.

त्याची भक्ती, प्रवृत्ती म्हणजे ऐहिक जीवनातील कृत्ये करणे आणि निवृत्ती म्हणजे ऐहिक जीवनापासून परावृत्त होणे या दोहोंत समतोल साधते. मनुष्यमात्राच्या आंतरिक जीवनाचा आणि बाह्य जीवनाचा काटेकोरपणे सांभाळलेला तोल म्हणजे त्याची भक्ती होय. तो विचर, भावना आणि आचार या मानवी व्यक्तिमत्वाच्या तिन्ही पैलूंचा क्वचितच आढळणारा सुखद संयोग आहे.

तो कृतीवीर होता. त्याच्या कार्याची मुळे पायाशुद्ध तत्वज्ञानात व उदात्त जीवनदृष्टीत खोलवर रुजलेली होती आणि त्याची ही जीवनदृष्टी अखिल विश्वातील प्राणिमात्रांबद्दलच्या निरपेक्ष प्रेमाने, मनुष्यमात्राबद्दलच्या अतुलनीय करुणेने प्रभावित झाली होती. त्याचे जीवन असे बहुमिती होते आणि प्रत्येक क्षेत्रातील त्याची कार्यसिद्धी एकमेवाद्वितीय होती.

कोणाही साक्षात्कारी व्यक्तीप्रमाणे परमोच्च आनंदाची अवस्था बसवेश्वराला प्राप्त झाली होती. ही अवस्था प्राप्त करण्यासाठी त्याने जीवनाकडे पाठ फिरविली नाही किंवा संन्यासमार्ग पत्करला नाही. त्याने लौकिक जगाचा स्वीकार केला एवढेच नव्हे तर, त्याबद्दल आदरभाव बाळगला. दैनंदिन व्यावहारिक जीवनातील सर्वसाधारण गोष्टींकडे त्याने मुळीच पाठ फिरविली नाही.

देशाच्या राजकीय जीवनात त्याने महत्त्वपूर्ण पद सांभाळले. त्याचे कौटुंबिक जीवन सुखासमाधानाचे होते. संन्यस्तभाव म्हणजे जीवनाला नकार हे त्याला मान्य नव्हते. कामिनी, कनक आणि भूमी ही मायेची भुलावण आहे या विचाराशी तो



सहमत नव्हता. आपल्या एका वचनात तो म्हणतो,

*विषयवासना गाडल्याने*
*घडते इतकेच की,*
*तुम्ही नकळत दचकवणाऱ्या विकृतींचे धनी होता,*
*पाची संवेदना समोर ठाकतात*
*आणि खदाखदा हसतात*
*श्रीयाळ आणि चांगळेने*
*आपल्या विवाहसुखाच्या प्रेमभरल्या रात्री*
*टाकून दिल्या का?*
*सिंधू बल्लाळाने*
*आपली शृंगारसुखे नि उपभोग*
*टाकून दिले का?*
*हे कूडलसंगमदेवा,*
*मी तुझ्यापुढे शपथ घेतो,*
*अन्य कोणाच्या धनदौलतीची वा पत्नीची*
*अभिलाषा धरली असेल मी*
*तर मला तुझ्या चरणांपासून ढकलून दे*
*अगा, कूडलसंगमदेवा.*

सर्वांनी इंद्रिसुखाचा आनंद न्याय्य रीतीने घेतला पाहिजे. त्यात गैर काहीच नाही पण त्याच बरोबर, व्यक्तीच्या सुखोपभागाला मर्यादा असतात हे जाणून घेऊन आपण संयमी व्हायला हवे. इंद्रियनिग्रह आत्मप्रेरित आणि सहज स्वाभाविक असावा. कृत्रिमपणे केलेला इंद्रिय निग्रह आणि आत्मक्लेश व्यर्थ आहे. आध्यात्मिक प्रवासात सुख सुविधा पुरविणाऱ्या चाकराची भूमिका इंद्रियांनी बजावली पाहिजे. आत्म्याच्या प्रगतीचा मार्ग रोधून धरणाऱ्या जुलमी राजाचे रुप त्यांनी धारण करता कामा नये.

ऐहिक सुखाची अपूर्णता तर आपण जाणली पाहिजे, मात्र त्यामुळे आपण हताश होण्याचे कारण नाही. मानवी आयुष्यात, अगदी या जन्मामध्येही शाश्वत सत्याचा साक्षात्कार होणे शक्य आहे. म्हणूनच, हे मर्त्य जीवन पवित्र आणि मौल्यवान आहे. बसवण्णा म्हणतो 'हे मर्त्य जग म्हणजे निर्मिकाची टाकसाळ आहे. आपण सारे त्या टाकसाळीतील नाणी आहोत. जर एखादे नाणे इथे खोटे निघाले तर ते तिथेही ख़ोटे ठरेल. जे आता इथे चांगल्याप्रमारे जगूवागू शकत नाहीत, त्यांना नंतर तरी काय प्राप्त होऊ शकणार आहे?' असा रोकडा प्रश्न तो विचारतो. एखाद्या चालत्या बोलत्या प्रेतासारखे उदासीन, घृणास्पद जीवन अंगिकारणे हा आध्यात्मिक जीवनमार्ग तर नव्हेच; पण त्याला खऱ्या अर्थाने संन्यासही म्हणता

येणार नाही. आपण हे लौकिक जीवन तर उत्तमप्रकारे जगले पाहिजेच पण त्याचबरोबर मर्त्य जीवनाच्या कक्षा ओलांडणारे आध्यात्मिक जीवनही संपादिले पाहिजे.

इथे जीवन हा शाश्वताच्या मार्गावरील अडथळा बनत नाही, तर उलट त्याला महत्त्व प्राप्त होते. आपण एखाद्या योद्ध्याप्रमाणे संसाररुपी मत्त घोड्यावर मांड टाकून स्वार झाले पाहिजे. त्याच्या आधीन राहाण्याऐवजी त्याच्यावर हुकुमत चालविली पाहिजे. संसाररुपी मत्त घोड्याला काबूत आणण्यासाठी उपयुक्त असलेली नैतिक आणि आध्यात्मिक तत्त्वे बसवण्णा विशद करतो.

अभिनिवेशी वक्तृत्व किंवा काथ्याकूट करणे त्याला उपयुक्त वाटत नाही. आचरणात न आणता येण्याजोगे कोणतेही तत्त्व त्याने सांगितले नाही. आधी केले, मग सांगितले हा त्याचा जीवनमंत्र होता. मानव तितुका एकचि आहे असे तत्त्व सांगणारी उपनिषदें शिरोधार्य मानणाऱ्या हिंदू समाजाच्या प्रत्यक्ष जीवनव्यवहारात असलेल्या हजारो जाती-जमाती, श्रेणीवर आधारित चातुर्वर्ण्याची उतरंड हे उपनिषदातील तत्त्वज्ञानाचे चाललेले विडंबन त्याच्या ध्यानात आले. भरीसभर म्हणून अस्पृश्यतेची महाभयंकर रुढी होती. अशा रुढीचे पालन ही मनुष्य म्हणवून घेण्यास लांच्छनास्पद गोष्ट आहे, तो सामाजिक कलंक आहे, असे बसवाचे मत होते.

संपूर्ण समाजव्यवस्थेचा त्याने धिक्कार केला आणि चातुर्वर्ण्याच्या किंवा श्रमविभागणीच्या तत्त्वाच्या बुरख्याआड चाललेल्या पिळवणूकीच्या आणि स्वार्थी, संधिसाधुपणाच्या विरोधात त्याने आघाडी उघडली. धर्माचे सत्यस्वरुप त्याने तर्कशुद्धपणे विशद केले. त्याच्या बुद्धिप्रामाण्यवादी भूमिकेचे उदाहरण म्हणून पुढील वचन सांगता येईल.

*हत्या करतो तो नीच*
*सडके मांस खातो तो शुद्र.*
*यात जात ना पात!*
*कुडलसंगमाला शरण जातो*
*चराचरावर प्रेम करतो*
*तो खरा कुलवंत असतो.*

माणसाची प्रतिष्ठा त्याच्या जन्मावरुन न ठरवता त्याच्या आचार-

विचारावरुन, जीवनसरणीवरुन आणि चारित्र्यावरुन ठरवावी असे बसवेश्वराने आग्रहाने सांगितले.

शेकडो जाती, त्यांच्या उपजाती आणि त्यांचे श्रेष्ठ-कनिष्ठतेवरुन होणारे झगडे पाहून त्याला घृणा येई. संपूण मानव-समूहात भक्त आणि भवी म्हणजे चांगली आणि वाईट अशा दोनच जाती त्याने मानल्या. आपल्या विचाराच्या पुष्ट्यर्थ त्याने अनेक



ऋषिमुनींची, द्रष्ट्या पुरुषांची उदाहरणे दिली आणि जन्माने प्राप्त होणाऱ्या जातीवर व्यक्तीचे श्रेष्ठत्व अवलंबून नसते हे दाखवून दिले.

*व्यास कोळ्याचा पुत्र*
*मार्कंडेयाचा जन्म भ्रष्ट जातीत*
*मंदोदरी मंडुकदुहिता*
*तेव्हा, पाहू नको जात-पात.*
*आपला भूतकाळ काय सांगतो?*
*अगस्त्य पारधी होता,*
*तर दुर्वास चांभार होता.*
*काश्यप सोनार होता.*
*कौंडिन्य ऋषी खरा, पण*
*जगाच्या दृष्टीने तो न्हावी होता.*
*अत: कूडलसंगमाचे तत्त्व ध्यानी धरा*
*जातीच्या कनिष्ठतेची खंत दूर सारा*
*शिवभक्त हाच वर्णश्रेष्ठ खरा.*

अशाप्रकारे त्याने जातिग्रस्त समाजाचा धिक्कार केला आणि हिंदू समाजातील चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या विरोधात संघर्ष करण्यासाठी धैर्याने आवाज उठविला.

रोटी-बेटी व्यवहार किंवा दैनंदिन जीवनातील अन्य बाबीत जातीच्या आधारे केला जाणारा तरतमभाव त्याला मान्य नव्हता. अशा प्रकारचा आपपरभाव कृत्रिम भेदावर आधारलेला असतो आणि तो माणसा-माणसात मोठी दरी निर्माण करतो असे त्याचे मत होते.

*त्यांच्या मते व्रतभंग होत नसतो*
*अन्नसेवनाने वा, वेषभूषेने*
*मात्र जात लक्षात घेतात ते*
*विवाह जमविताना.*
*हे भक्त तरी कसले ?*
*आणि सिद्ध तरी कसले ?*
*बरे का, कूडलसंगमदेवा*
*हे सारे रजस्वलेने*
*शुद्ध पाण्यात न्हावे तसे आहे.*

हे खरोखरच क्रांतिकारी होते. विशेषत: आठशे वर्षांपूर्वीच्या जातीव्यवस्थेत रुतून बसलेल्या समाजावर अशा बंडखोर विचाराचा कोणता परिणाम झाला असेल याची कल्पना करणे शक्य आहे. केवळ अशाप्रकारचा विचार मांडून बसवा थांबला

असता तर प्रतिगामी शक्तींनी कदाचित त्याच्याकडे दुर्लक्ष केले असते. परंतु, बसवाने आपला विचार प्रत्यक्ष आचरणात आणला. ज्यांना उच्चवर्णीय दूर ठेवीत असत आणि ज्यांची केवळ दृष्टी पडली तरी शुद्ध होण्यासाठी स्नान केले जाई त्याच अस्पृश्य मानल्या गेलेल्या लोकांना बसवण्णाने स्थापन केलेल्या सामाजिक धार्मिक विचारमंचाचे म्हणजेच अनुभव मंडपाचे सभासदत्व देण्यात आले. धार्मिक आणि सामाजिक बाबतीत त्याने त्यांना समान दर्जा दिला. तो म्हणतो,

*मी श्रियाळाला सावकार म्हणू?*
*आणि माचय्याला धोबी ?*
*कक्कय्याला ढोर म्हणू ?*
*आणि चन्नय्याला चांभार ?*
*आणि मी जर स्वत:ला ब्राह्मण म्हणविले*
*तर कूडलसंगम माझी खिल्ली उडवेल.*

जन्माधिष्ठित श्रेष्ठत्वाधारे नव्हे तर गुणाधिष्ठित तत्त्वाच्या आधारे योग्य ठरणारे सर्व लोक धार्मिक दृष्ट्या संपूर्णत: समान असल्याचा निर्वाळा यात स्पष्ट दिसतो.

या सामाजिक सुधारणेचा परिणाम म्हणून बसवाला प्रतिगामी शक्तींच्या प्रखर विरोधाला तोंड द्यावे लागले. असे असूनही तो महत्वपूर्ण फलित साध्य करु शकला कारण तो केवळ एखाद्या स्थानिक अथवा सीमित सामाजिक सुधारणेचा प्रचारक नव्हता. प्रेम आणि फक्त प्रेम हेच त्याच्या सामाजिक सुधारणेचे अधिष्ठान होते. त्याचे माणुसकीबद्दलचे प्रेम आणि विशेषत: अध:स्तरावरील आणि खचलेले, रंजले गांजलेले, पददलित आणि समाजाने झिडकारलेले लोक अशा सर्वांबद्दल त्याला वाटणारा जिव्हाळा अमर्याद होता. एकरुप होतो तो सर्वसामान्य माणसाशी आणि त्यापुढे जाऊन, अगदी असेही म्हणतो :

*जर कक्कया ढोर माझा पिता आहे*
*आणि चिन्नया आजा आहे*
*तर मी मुक्त का नाही होणार?*

या अक्षय प्रेमभावाचे आणि करुणेचे रुपांतर मानवतेच्या पूजेत होऊन तो मानवतेचा पुजारी बनला.

प्रेम आणि करुणा हे त्याच्या तत्त्वज्ञानाचे आणि धर्माचे परवलीचे शब्द होते. आपल्या एका सुप्रसिद्ध वचनात तो म्हणतो,

*असा कोणता धर्म असेल?*
*ज्यात करुणा नाही*
*करुणा असायला हवी*
*साऱ्या जीवजाताविषयी*



*करुणा मूळ आहे,*
*धर्मश्रद्धेचे*
*कूडलसंगमदेव फिकीरही करीत नाही*
*करुणाहीनाचे.*

त्याच्या सर्व सामाजिक आणि धार्मिक सुधारणांना या करुणेचे आणि मानवतेबद्दलच्या सर्वव्यापी प्रेमाचे अधिष्ठान होते.

खरे तर, सामान्यत: जिला सुधारणा म्हटले जाते, त्यावर बसवाचा विश्वास नव्हता. त्याचा विश्वास विकासावर, उत्कर्षावर होता. मनुष्यमात्राचे ऐक्य आणि त्याच्यातील अंगभूत दैवी सामर्थ्य या वेदांतिक आदर्शाच्या रोखाने एका सबंध पिढीला त्याने विकासोन्मुख केले. त्याने जीवनाचे स्थिर चित्ताने व समग्रपणे अवलोकन केले. त्याच्याजवळ सर्वंकष मर्मदृष्टी होती आणि म्हणूनच धर्माच्या नावाखाली चाललेले समाजाचे कृत्रिम विघटन तो सहन करु शकला नाही. व्यक्तिविकासाच्या आड येणाऱ्या कृत्रिम अडथळ्यांविरुद्ध संतापून जाऊन त्याने अशा विसंवादाविरुद्ध आणि विषमतेविरुद्ध तीव्र संघर्ष केला. परिपूर्ण समता प्रस्थापित करण्याचा त्याचा प्रयत्न होता. सारेच उद्ध्वस्त करणे त्याला मंजूर नव्हते, उलट जात, संप्रदाय अथवा लिंगविशिष्ट भेदभाव न बाळगता सर्वांना संधी देऊन सर्व समाज उन्नत करणे त्याला अभिप्रेत होते, कारण त्याला परिपूर्ण, संपूर्ण समता प्रस्थापित करावयाची होती.

कोणत्याही प्रकारचा व्यवसाय करणारी व्यक्ती असली तरी तिला धर्मोपासनेच्या आणि आध्यात्मिक विकासाच्या समान संधी देणारा आदर्श समाज उभा करण्याचे त्याचे ध्येय होते. व्यवसायावरुन व्यक्तीची सामाजिक प्रतिष्ठा ठरविणारी प्रचलित रीत त्याला बदलावयाची होती. कोणताही व्यवसाय श्रेष्ठ अथवा कनिष्ठ प्रतीचा नसतो. प्रामाणिकपणा आणि सच्चेपणावरुनच उपजीविकेच्या साधनाचे मूल्य ठरत असते, त्यालाच 'कायक' म्हणतात असे त्याने स्पष्ट प्रतिपादन केले.

आणि म्हणूनच हरळय्या आणि बसव या दोघांची आध्यात्मिक प्रगती समान असल्यामुळे हरळय्या जरी कनिष्ठ जातीत जन्मलेला आणि चांभाराचा व्यवसाय करणारा असला तरी त्याला आणि राज्याचा मंत्री असलेल्या बसवण्णाला समान लेखले गेले. अशा प्रकारच्या सामाजिक समतेवर बसवाचा दृढ विश्वास होता आणि म्हणून आपल्या नव्या धर्मविचारात त्याने सर्वांना समान संधीची तरतूद केली.

परंतु, सारेच चांभार काही हरळय्यासारखे नव्हते हे ही लक्षात घेतले पाहिजे. संधीचा योग्य उपयोग करुन घेऊन आध्यात्मिक प्रवृत्तीच्या साह्याने परिस्थितीवर मात करणाऱ्यांनाच फक्त उपासकांच्या मंडळात मान्यता मिळू शकली. विचार, उक्ती आणि आचार यातील शुद्धतेमुळे त्यांचे जीवन स्वच्छ, पारदर्शी बनले.

जात, संप्रदाय अथवा लिंगविशिष्ट भेदभाव न करता बसवाने सर्वांना समान सामाजिक आणि धार्मिक संधी खुल्या केल्या हे त्याचे लक्षणीय योगदान होय.

हरएक प्रकारच्या लोकांचे धर्मांतर करुन बसवेश्वराने त्यांना वीरशैव बनविले अशी एक गैरसमजूत आहे. परंतु वैयक्तिक आणि सामाजिक नीतिमूल्यांवर आधारलेल्या अध्यात्ममार्गावर जे दृढनिश्चयाने वाटचाल करतात तेच खरे भक्त बनतात हे तो जाणून होता. धर्माच्या नैतिक पैलूविषयी तो अत्यंत चोखंदळ होता, म्हणूनच वीरशैव धर्मात प्रवेश करण्याची केवळ इच्छा आहे एवढ्या कारणासाठी त्याने कोणाला आपल्या धर्मात घेतले नाही.

दगलबाजी आणि चोरी, हाव आणि हिंसा, दुष्टावा आणि गैरवर्तन यांना त्याने कोणतीही दया न दाखविता, कठोरपणे शिक्षा फर्मावली;आणि निष्कलंक चारित्र्य, सद्वर्तन, नम्रता, नागरी सभ्यता आणि स्वच्छतेच्या सवयी यांना त्याने सर्वाधिक महत्व दिले. त्याची कांही वचने शाश्वत मूल्ये अभिव्यक्त करतात. आणि टेन कमांडमेंट्स किंवा सर्मन ऑन द माउंट प्रमाणे श्रद्धेने वाचली जातात. एक वचन नमूना म्हणून पाहू.

*चोरी करु नको*
*कोणा ठार मारु नको*
*खोटे बोलू नको*
*कोणावर संतापू नको*
*आत्मस्तुति करु नको*
*अन्यास तुच्छ मानू नको.*
*हीच आंतर्शुद्धी*
*हीच बहिर्शुद्धी*
*हीच वाट खरी आपल्या*
*कूडलसंगमाच्या प्राप्तीची*

आंतर्बाह्य शुद्धतेला तो महत्व देता. तन आणि मन, हृदय आणि आत्मा, इच्छा आणि जाणीव शुद्ध असते तेव्हाच त्याची परमेश्वराप्रत असलेली भक्ती फलद्रूप होते.

अशाप्रकारे सन्मार्गाने चालणाऱ्या लोकांनाच भक्त मानले गेले आणि त्यांनाच दीक्षा देऊन नव्या पंथात प्रवेश दिला गेला. वीरशैव धर्मत प्रवेश केल्यानंतर त्यांचे जुने वर्ण आपोआपच जळून गेले आहेत आणि नव्या जीवनाचा प्रारंभ झाला आहे,असे बसवेश्वराने घोषित केले. धर्मांतरापूर्वी अस्पृश्य मानले गेलेले हरळय्या, नागमय्या, धूळय्यासारखे लोक आणि धर्मांतरापूर्वी ब्राह्मण असलेले बाचरस, शांतरस, मधुवरस हे सारेच सर्वार्थाने, सर्व बाबतीत समान झाले. एका फटक्यात



त्याने सामाजिक, राजकीय समता आणि सर्वसामान्यांची आत्मिक उन्नती अशी सर्व उद्दिष्टे पूर्ण केली. यापूर्वी कधीही कोणताही धार्मिक दृष्टिकोण इतका सखोल नव्हता आणि इतका मोठा प्रतिसादही त्याला यापूर्वी कधी मिळाला नव्हता ही गोष्ट ध्यानात ध्यायला हवी. अस्पृश्य मानला गेलेला मादरधुळय्या, तुरगाहा रामण्णासारखा गुराखी, जोधरा मायण्णासारखा सैनिक या आणि अन्य अगदी सर्वसामान्य लोकांनी आध्यात्मिक उंची गाठली आणि आपले गूढ, अध्यात्मिक अनुभव वचनांद्वारे अभिव्यक्त केले.

बसवेश्वराने केलेले तितकेच महत्वाचे कार्य म्हणजे स्त्रियांची बंधमुक्तता होय. गार्गी-मैत्रेयीचे युग उलटून पुष्कळ काळ लोटला होता. स्त्रियांना आणि शूद्रांना वेदाध्यनाचा अथवा अन्य कोणत्याही धर्मग्रंथाच्या अध्ययनाचा अधिकार नव्हता, अशा परिस्थितीत धर्मामध्ये स्त्री-पुरुष भेद नाही असे बसवाने स्पष्टपणे उद्घोषित केले. शुद्ध अंत:करण आणि उत्कट इच्छा असलेल्या सर्वांना, मग त्या कुणी स्त्रिया असोत अथवा पुरुष, त्याने आध्यात्मिक क्षेत्राची दारे उघडी केली. म्हणूनच आपल्याला या पंथात अक्कमहादेवी, अक्कनागम्मा, नीलाम्बिका, गंगाम्बिका, लक्कम्मा, लिंगम्मा आणि महादेवम्मा अशा कितीतरी आध्यात्मिक उच्चाधिकार प्राप्त झालेल्या संत स्त्रिया आढळतात.

धर्मामध्ये सर्वांना समान संधी आहे या उद्घोषाच्या जोडीनेच धर्मग्रंथ आणि उपाध्यायांच्या तावडीतून धर्माला मुक्त करण्यासाठीही बसवेश्वराला संघर्ष करावा लागला. 'वेदाध्ययन करुन काय मिळते? शास्त्रश्रवणाने काय प्राप्त होते? जप-तपाने काय साध्य होते? असे प्रश्न करुन उक्तीप्रमाणे कृती झाल्याशिवाय कूडलसंगमदेव प्रसन्न होत नाही, असे तो बजावतो. उक्ती आणि कृती यांची एकरुपता हे साधकाचे आवश्यक गुणवैशिष्ट्य आहे असे तो पुन:पुन्हा स्पष्ट करतो.

*वेदांच्या, शास्त्रांच्या भाटांना*
*मी थोर मानीत नाही*
*भ्रांतीच्या बुरख्याआड दडलेल्यांनाही*
*मी थोर मानीत नाही.*

ज्यांनी माया अथवा भ्रांती दूर सारली आहे, तेच श्रेष्ठ होत. तन,मन आणि आचरणाने शुद्ध असणाऱ्या कोणालाही हे थोरपण प्राप्त होऊ शकते.

वेदांतील विधियुक्तता, कर्मकांड याला त्याने कडाडून विरोध केला पण उपनिषदातून प्रकटणाऱ्या सत्याचा स्वीकार केला. 'करुणेशिवाय धर्म असूच कसा शकेल'? असा प्रश्न विचारणारा करुणानिधी बसव पशूला बळी देण्याच्या रुढीबद्दल कोणत्याही प्रकारची तडजोड स्वीकारु शकला नाही. आपल्या एका वचनामध्ये त्याने करुणेचा, दयेचा सूर आळविला आहे. बळी देण्यासाठी यज्ञाकडे नेल्या जाणाऱ्या

बोकडाला उद्देशून तो म्हणतो,

*रड, ओरड*
*हे बकरी, तू टाहो फोड*
*म्हण की, वेद प्रामाण्याने*
*तुला बळी दिले जात आहे.*
*धाय मोकलून रड त्यांच्यापुढे*
*जे वेदपठन करतात*
*टाहो फोड त्यांच्यापुढं*
*जे शास्त्रश्रवण करतात*
*कूडलसंगमदेव नक्कीच घेईल*
*तुझ्या आक्रोशाची दखल.*

बुद्धही असाच अस्वस्थ आणि करुणेने व्याकुळ झाला होता. आणि त्यानेही बळिप्रथेच्या आणि अन्य रुढींच्या विरोधात संघर्ष केला होता. बसवण्णाने अशा रुढींविरुद्ध आणि या रुढींना जबाबदार असणाऱ्या पुरोहितवर्गाविरुद्ध बंड पुकारले.

बसवेश्वराने एकाच देवावरील उत्कट प्रेमाचा आणि प्रगाढ भक्तीचा पुरस्कार केला. अनेकेश्वरी भूमिका, अनेक देवतांची उपासना त्याला मान्य नव्हती. त्याची ही निष्ठावान, कडवी एकेश्वरी भूमिका अनेक वचनांमधून अभिव्यक्त झाली आहे. तो म्हणतो.

*देव एकच आहे, जरी त्याची नावे अनेक*
*पतिव्रता मानते, पती फक्त एक.*

क्षुल्लक कारणांसाठी (हेतूंच्या पूर्तीसाठी) केल्या जाणाऱ्या मारी, मसणी यासारख्या शेकडों देवदेवतांच्या उपासनेवर तो टीका करतो. गाईने दूध द्यावे, रडणारे मूल शांत व्हावे, गर्भ रहावा यासारख्या कारणांसाठी ज्यांची उपासना केली जाते अशी बीरय्या, केटय्या यासारखी शेकडो मडकी 'हे कूडलसंगमदेवा मला थारा दे' अशा हाकेच्या केवळ एका धक्क्याने पार हादरुन जातील असे तो उपहासाने म्हणतो. इथे, भयावर आणि खुळचट समजुतींवर आधारलेल्या धर्मात आणि प्रेम, स्वार्थत्याग, आत्मार्पणावर आधारलेल्या धर्मात बसवेश्वर काटेकोर भेद करताना दिसतो.

वीरशैव धर्ममताने मान्यता दिलेल्या इष्टलिंगाच्या रुपातील एकेश्वरी उपासनेचा तो पुरस्कार करतो. त्याला अनुसरुन, त्याची ईश्वराबद्दलची संकल्पना इतकी भव्य आणि पटण्याजोगी आहे की कोणा बुद्धिप्रामाण्यवाद्यालाही तिचा मोह पडावा.

*जेथे पाहे तेथे । तू आहेस देवा ।*
*अवकाशव्याप्त । तुझा आकार ।*



*तूच नेत्र विश्वाचे । मुखही तूच ।*
*साऱ्यांचे बाहू तूच । आणि चरणही तूच देवा ।*
*हे कूडलसंगमदेवा । सर्वत्र तूच ।*

ब्रह्मा-विष्णु-महेश या त्रिमूर्ति कल्पनेच्याही पलीकडे तो जातो.

सर्वोच्च शक्तीने इष्टलिंगाचा आकार धारण केला आणि गुरुकृपेमुळे तो उपास्य बनला.

प्रत्येकाने आपल्या अंगावर धारण केलेले इष्टलिंग ही वीरशैव धर्मांच्या आचारसंहितेतील केंद्रवर्ती कल्पना आहे. इथे तिची अधिक तपशीलाने चर्चा करण्याची आवश्यकता नाही. ती निराकार ईश्वराची संकल्पना आहे. शून्य अथवा परिपूर्णतेचे प्रतीक म्हणून गुरु साधकाला इष्टलिंग प्रदान करतो आणि त्याच्या कानात षडाक्षरी मंत्र उच्चारतो. तळहातावर घेऊन दररोज पुजले जाणारे हे इष्टलिंग साधकाच्या मनाचा संपूर्ण ताबा घेते आणि बसवेश्वराच्या भक्तीचा विकास स्पष्ट करणाऱ्या मागील प्रकरणात उल्लेखिलेल्या प्राणलिंगात आणि भावलिंगात उत्क्रांत होण्यास मदत करते. साधकाने आपल्या ध्यानाची सारी ताकद एकवटून एकनिष्ठपणे इष्टलिंगाची उपासना केली पाहिजे असे बसवेश्वर निक्षून सांगतो.

अशाप्रकारे अन्यायाची, पिळवणुकीची साधने बनलेली देऊळधार्जिणी वृत्ती आणि पुरोहितशाही दूर ढकलण्यात बसव यशस्वी झाला. उपासना म्हणजे साधक आणि ईश्वर यांच्यातील व्यक्तिगत साहचर्य होय. लिंग आणि भक्त यांच्यात कोणी मध्यस्थ आवश्यक नसल्यामुळे हे साहचर्य इष्टलिंगाद्वारे प्रत्यक्ष प्राप्त करुन घेता येते. मंदिरात दुसऱ्या कोणा करवी पूजा करवून घेणे निरर्थक आहे. बसवेश्वर म्हणतो:

*मध्यस्थाच्या मार्फत*
*कुणी जेवण करु शकतो?*
*की प्रेम करु शकतो ?*
*हे सारे स्वत:च करावे लागते*
*लिंगाचे विधिविधानही*
*मध्यस्थामार्फत होत नाही*
*हे कूडलसंगमा,*
*केवळ उपचार पाळून*
*ते तुला कसे जाणू शकतील?*

अशाप्रकारे मध्यस्थाकडून करवली जाणारी ईश्वराची पूजा सर्वथा त्याज्य मानली गेली.

या धार्मिक बुद्धिवादाने लोकांना जीवनाकडे बघण्याची नवी दृष्टी दिली. कोणतीही घटना हे आपल्या कर्माचे फलित असते, माणूस फसव्या नियतीच्या

मर्जीवर खालीवर होणारे केवळ बाहुले असतो अशा प्रकारच्या दैववादी जडत्वाकडे नेणाऱ्या कर्मसिद्धांतावर (बसवेश्वराच्या विचाराने) नवा प्रकाश टाकला. या पराभूतवृत्तीच्या विरोधात बसवण्णाने उग्र बंड केले आणि पूर्वकर्म निरसून टाकण्याठी व त्याच्या वर्तमानातील आणि भविष्यकालीन कृत्यांमुळे येणाऱ्या आत्मविश्वासाने भवितव्याला आकार देण्यासाठी नवी शक्ती, नवा जोम आणि सत्वसंपन्नता मनात बिंबविली.

बुद्धिवादी असल्यामुळे बसवाने आध्यात्मिक उन्नतीस साहाय्य करणाऱ्या श्रद्धेचा स्वीकार केला. पण अंधश्रद्धा आणि भोळसट चालीरीतींचा, रुढींचा स्वीकार केला नाही. फलज्योतिष, शकुन-अपशकुन, दिवस, आठवडे अथवा तारे यांचा प्रभाव यासारख्या असंख्य अंधश्रद्धा लक्षावधी लोकांच्या मनात खोल रुतून बसल्या होत्या. कोणत्याही छोट्या-मोठ्या कारणासाठी प्रत्येक ठिकाणी दैवी शक्तीवर, चमत्कारावर विसंबून राहाण्याची लोकांना सवय पडली होती. धर्मगुरुंचा, पुरोहितांचा दांभिकपणा, भ्रष्टाचार आणि लबाडी त्यांच्या भोळ्या मनाला कळत नव्हती. बसवाने या सगळ्याचा निषेध केला आणि हा धार्मिक अन्याय निपटून टाकण्याचा कसोशीने प्रयत्न केला. तो ठामपणे सांगतो.:

*जेव्हा जेव्हा आपले अंत:करण कौल देईल,*
*ती शुभ वेळ आहे, हे खुशाल जाण*
*सारे शकुन शुभ आहेत असे मान*
*मीलनाची सुनिश्चिती आहे,*
*चंद्र-तारे अनुकूल आहेत*
*आणि हो, उद्यापेक्षा 'आज' अधिक चांगला आहे.*
*जे सहजी फलप्रद होते*
*कूडलसंगाच्या उपासकांना ,ते तुझेच!*

दुसऱ्या एका वचनात त्याने म्हटले आहे, 'शिव हेच आश्रयस्थान मानणाऱ्या आणि शिवाची नित्य, न चुकता प्रार्थना करणाऱ्याला सगळे दिवस सारखेच असतात.' साधकाने कोणत्याही दिवसाचा, वराचा भक्त असू नये. तो परमोच्च शक्तीवर अविचल निष्ठा ठेवणारा ईश्वराचा भक्त असला पाहिजे.

वचनात अभिव्यक्त केलेले हे सत्य बसवण्णाने प्रत्यक्ष आचरणात आणून दाखविले.

*माझ्या मुळी ध्यानातच येत नाही*
*अमका दिवस आणि तमका आठवडा*
*अमकी रास चांगली की वाईट !*
*माझ्या दृष्टीने रात्र हा एक विभाग*
*आणि दिवस हा दुसरा विभाग*



*भक्ताची एक जात.*
*आणि 'अ' भक्ताची दुसरी जात.*

त्याच्यादृष्टीने सारेच शकुन शुभ होते आणि सारेच दिवस पवित्र होते. ते म्हणजे महामेरुपर्वताच्या आश्रयाला राहूनही आपल्या सावलीचा शोध घेण्यासारखे होते. कारण, ज्यांनी महामेरुचा म्हणजे शिवाचा आश्रय घेतला आहे, त्यांना शुभ आणि अशुभ असा भेद कुठे उरतो?

बुद्धीच्या, विवेकाच्या विरोधी असलेल्या प्रत्येक गोष्टीविरुद्ध त्याने बंड केले आणि भूतकाळाच्या ओझ्यामुळे तयार झालेला मानसिक व्यामोह आणि शारीरिक जडत्व यात बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी तो कोणत्याही धर्मशास्त्राकडे वळला नाही किंवा त्याने कोणत्याही धर्मग्रंथाचे बिनशर्त प्रामाण्य स्वीकारले नाही. विशेषाधिकार असलेल्या (वरच्या वर्णातील) लोकांचे दुर्गुण आणि पापाचरण तो सहन करु शकला नाही. आणि त्याने वर्गभेद आणि जातिभेद याविरुद्ध तीव्र संघर्ष केला. तत्कालीन परिस्थितीत हा संघर्ष अत्यंत क्रांतिकारी ठरला.

आचार-विचारातील शुद्धतेला त्याने सर्वाधिक महत्व दिले. त्याच्या दृष्टीने साध्याएवढेच साधनालाही महत्व होते. आचार-विचारातील शुद्धतेने युक्त अशा या आध्यात्मिक तत्त्वविचाराला त्याने 'कायक' हे संबोधन दिले, ज्याला तत्कालीन शरणसांप्रदायिकांच्या जीवित ध्येयाच्या दृष्टीने फार महत्वपूर्ण स्थान प्राप्त झाले.

# 4
# कायकाचा संदेश

'कायक' म्हणजे प्रामाणिक शरीरश्रम परंतु केवळ चरितार्थासाठी केल्या जाणाऱ्या शारीरिक कष्टापेक्षा अधिक काही तरी या संकल्पनेत अंतर्भूत आहे. कायकाची संकल्पना हे बसवण्णाने व्यावहारिक तत्वज्ञानाला दिलेले महत्त्वपूर्ण योगदान आहे. बसवण्णा आणि अन्य शरणांची कायकाचा उपदेश करण्याची कळकळ आणि आचरणाची वैशिष्ट्यपूर्ण पद्धत यामुळे कायकाला नवे परिमाण प्राप्त झाले. बसवण्णाने आचार आणि विचाराच्या एकरुपतेचे तत्त्व त्यात गोवले. तो स्वत:ही विचाराबरोबरच कृतीला महत्त्व देणारा होता. साऱ्या विश्वाने अंमलात आणावी, अनुसरावी इतकी ही संकल्पना सर्वसमावेशक आहे.

उपजीविकेसाठी करावयाचे श्रम हा त्याचा साधा, प्राथमिक अर्थ. गांधींजींच्या शब्दात सांगायचे तर उत्पादक श्रम (bread-labour). 'निढळाचा घाम गाळून भाकरी मिळविण्यास- उपजीविका करण्यास निसर्ग आपल्याला प्रवृत्त करतो' असे गांधीजी सांगतात. श्रीमंत असो वा गरीब, प्रत्येकाने कोणत्या ना कोणत्या रुपात शारीरिक कष्ट करणे अपरिहार्य असते. मग त्याला उत्पादक श्रमाचे रुप का देऊ नये? हेच सूत्र पकडून बसवेश्वर सांगतो की, सामाजिक गरजांच्या पूर्तीसाठी प्रत्येकाने थोडेफार तरी काम केले पाहिजे. भक्त असो, गुरु असो किंवा जंगम असो कोणालाही इतरांच्या श्रमावर आळशीपणाने बांडगुळासारखे जगण्याचा अधिकार नाही. प्रत्येकाने आपल्या कायकाद्वारे भौतिक आणि आध्यात्मिक उन्नती करुन घ्यावी आणि भिक्षावृत्ती व आळस याला समाजात थारा नसावा हे यातील अनुस्यूत तत्त्व आहे.

व्यवसाय निवडण्याच्या स्वातंत्र्याचे लोकशाहीवादी तत्त्व हा बसवण्णाने सांगितलेला कायकाचा आणखी एक महत्वाचा पैलू होय. कोणत्याही व्यक्तीचा व्यवसाय त्याच्या जन्माने अधिनिश्चित होत असतो असे अधिकारवाणीने सांगणाऱ्या जुलुमी कर्मसिद्धांताविरुद्ध त्याने बंड केले. जन्म, व्यवसाय अथवा लिंगावर आधारित अशा कोणत्याही प्रकारच्या भेदभावाचा बसवण्णाने धिक्कार केला.

जनसामान्यांच्या मनात आध्यात्मिक आणि सामाजिक जागृती करणारी ही एक मोठी सामाजिक क्रांती होती. सुरवातीला कायकाने माणसांना त्यांच्या व्यवसायानुसार



श्रेष्ठ अथवा कनिष्ठ ठरविण्याची, प्रतिष्ठा देण्याची सामाजिक सवय बदलून टाकली. कोणताही व्यवसाय दुसऱ्या एखाद्या व्यवसायापेक्षा श्रेष्ठ अथवा कनिष्ठ असत नाही. उपजीविकेच्या साधनाचे मूल्य प्रामाणिकपणा आणि कळकळ यावरुन निर्धारित होत असते असे बसवेश्वराने ठणकावून सांगितले. हाच कायकाचा बीजमंत्र होय. बसवाने सांगितलेला व्यवसायांच्या समतुल्यतेचा विचार आपल्याला कायकाच्या दुसऱ्या एका महत्वाच्या पैलूकडे घेऊन जातो.

त्याच्यामुळे जीवनाकडे पाहण्याचा अभिनव दृष्टिकोण तयार होतो. श्रमाची प्रतिष्ठा आणि त्याचे ईश्वरी रुप यांचा एकमेळ म्हणजे कायक होय. कायक म्हणजे केवळ उपजीवविकेसाठी करावयाचा व्यवसाय नव्हे. ते निर्लिप्त वृत्तीने केलेले काम असते आणि त्याद्वारे व्यक्ती आणि समाज या दोहोंच्याही गरजा पूर्ण व्हाव्या अशी अपेक्षा असते.

व्यक्तीचे अर्थार्जन केवळ तिच्या ऐहिक आणि पारमार्थिक प्रगतीसाठी उपयोगात आणले जाऊ नये तर ते तिहेरी 'दासोह'च्या म्हणजेच गुरु, लिंग आणि जंगम यांना अर्पिलेल्या धनाच्या रुपाने समाजाच्या भल्यासाठी उपयोगात आणले जावे. असे होईल तेव्हाच त्या व्यक्तीचा व्यवसाय कायक किंवा पवित्र कार्य किंवा उपासना या अभिधानास पात्र होईल.

बिज्जळाचे मंत्रीपद सांभाळण्यामागे स्वत:साठी धनसंपदा गोळा करण्याचा बसवेश्वराचा उद्देश नव्हता. आपण राजाच्या पदरी का राहिलो याबद्दल ईश्वराला उद्देशून तो कळकळीने विशद करतो,

*पहाटे उठून डोळे चोळताना*
*माझ्या मनी पोटाची विवंचना असेल,*
*मालमत्तेची चिंता असेल*
*तर माझे मनच*
*माझ्या मनाचा साक्षीदार*

त्याने ना कधी आपली किंवा आपल्या कुटुंबाची चिंता केली, ना कधी तो सत्तेच्या मोहात गुरफटला किंवा ना कधी मंत्रीपदाचा डामडौल त्याने मिरवला.

*शूद्रातिशूद्राच्या घरी जाऊन*
*मी हलके काम नीटसपणे करतो*
*तेव्हा माझा भाव तुझ्या निष्ठेचा असतो*
*पण मी उदरभरणाच्या चिंतेने झुरत राहिलो*
*तर माझे मस्तक खुशाल उडवले जाउदे*
*बा कूडल संगमदेवा.*

शूद्रातिशूद्र मानल्या गेलेल्या लोकांच्या घरी जाऊन त्यांची हलकी-सलकी कामे

करण्याची त्याची तयारी होती, पण ती उत्कृष्ट रीतीने करण्याकडे त्याचा कल असे. त्याच्या दृष्टीने जगाच्या भल्याकरता स्वीकारलेले आणि उत्तमरीतीने केले जाणारे प्रत्येक काम म्हणजे कायक होय. असे कायक ईश्वराच्या पूजेइतकेच पवित्र असते.

याच अर्थाने शरण 'कायक हाच कैलास' (शिवाचे निवासस्थान) असे म्हणतात. गांधीयुगानंतरच्या काळात वावरणाऱ्या आपल्यासारख्या लोकांना बसवण्णा आणि इतर शरणांनी पुरस्कारिलेल्या या आदर्शाची अन्वर्थकता कदाचित अधिक पटू शकेल.

खरे तर, गांधीजींच्या उत्पादक श्रमाच्या संकल्पनेत आणि बसवण्णाच्या कायकाच्या संकल्पनेत लक्षणीय साम्य आहे. गांधीजींना रस्किनच्या' अन टू धिस लास्ट' या ग्रंथांत आपल्यातील खोलवरचे गंभीर दोष प्रतिबिंबित झालेले आढळले. या ग्रंथाने त्यांना इतके भारुन टाकले की त्यामुळे त्यांचे सारे जीवनच बदलून गेले. त्या ग्रंथातील तत्त्वे प्रत्यक्ष आचरणात आणण्याचा त्यांनी निश्चय केला. गांधीजींनी आत्मसात केलेली त्या ग्रंथातील मुख्य शिकवण पुढीलप्रमाणे सांगता येईल.

1. व्यक्तीचे कल्याण सर्वाच्या कल्याणात समाविष्ट असते.
2. प्रत्येकाला आपल्या उपजीविकेसाठी कष्ट करुन अर्थार्जन करण्याचा समान अधिकार असतो. या न्यायाने (तत्त्वानुसार) वकीली आणि न्हाव्याचे काम या दोन्हीची प्रतिष्ठासारखीच असते.
3. कष्टकऱ्याचे म्हणजेच शेतात राबणाऱ्याचे आणि कारागिराचे जीवन अर्थपूर्ण असते.

ही सर्व तत्त्वे बसवण्णा आणि अन्य शरण सांप्रदायिकांनी विवेचिलेल्या 'कायक' तत्त्वाच्या गाभ्याशी आढळतील.

'सर्वांच्या भल्यात व्यक्तीचे भले समाविष्ट असते' यावर निर्देशिलेल्या पहिल्या तत्त्वावर बसवण्णाचा दृढ विश्वास होता. त्रिविध दासोह म्हणजेच गुरु, लिंग आणि जंगम यांच्या ठायी समर्पण ही कल्पना प्रामुख्याने याच तत्त्वावर आधारित आहे. गुरु, लिंग आणि जंगम यांना अनुक्रमे तन, बुद्धी, धन अर्पण केले पाहिजे असे तो सांगतो. गुरु किंवा शिक्षक उपास्याचे-लिंगाचे रहस्य उकलून दाखवितो. अशा प्रकारे हे दोन्ही (गुरु व लिंग) व्यक्तीला तिच्या आध्यात्मिक प्रगतीस उपकारक ठरतात.

परंतु 'जंगम'चा गर्भितार्थ वेगळा आहे. बसव या संकल्पनेकडे व्यापक दृष्टिकोणातून पाहातो. त्यांच्या दृष्टीने (जंगम) ही विशिष्ट जात किंवा पंथ नाही. तो विचारतो, 'लिंगात काही निर्दयता, कठोरता आहे का? जंगमात जात आहे का? सर्वव्यापी असतो तोच जंगम असतो. जो 'अहं'चा निरास करुन सर्व विश्वाला कवटाळतो आणि तरीही त्याच्या पलीकडे जातो तो खरा जंगम होय. अंत:प्रेरणेच्या ओढीने जंगम विश्वात्मक जाणिवेत प्रवेशत असल्यामुळे त्याचे वैयक्तिक किंवा खाजगी



असे काही असणे संभवत नाही.

एका अर्थाने बसवेश्वराच्या 'जंगम' संकल्पनेत सर्व सजीवांनी युक्त असे चराचर संपूर्ण विश्व समाविष्ट आहे. अशा प्रकारे 'जंगम दासोह' ही संकल्पना इतकी व्यापक बनते की, त्यात समाजाच्या सर्व प्रकारच्या सेवांचा सहज अंतर्भाव होतो. व्यक्तीने आपल्या व्यवसायातून मिळविलेले धन समाजाच्या कल्याणासाठी जंगमाला अर्पण केले पाहिजे. 'आरशात पाहाणाऱ्या बंधूनो, जंगमाकडे पाहा' असे सांगून पुढे बसवण्णा म्हणतो,' कारण त्याच्यात लिंगाची आभा चमकते. कूडल संगम म्हणतो, चर आणि अचर सारे एकच आहे.

हे जर समजले नाही तर तत्त्वज्ञानाचे जाड-जूड शब्द वापरणे काय कामाचे? शब्दांच्या फुलझडीत काय अर्थ आहे? जर जंगमाला स्नानासाठी पाणी दिले नाही आणि पूजेच्यावेळी अभिषेक म्हणून लिंगावर पाणी ओतले तर त्याचा काय उपयोग? म्हणून बसवेश्वर आपल्याला माणसाच्या हृदयात ईश्वर शोधण्यास सांगतो. आपल्या एका वचनात त्याने हे फार सुंदररीतीने पुढील शब्दात अभिव्यक्त केले आहे.

*दगडाचा साप पाहून ते म्हणतात*
*दुधाचा अभिषेक करा*
*प्रत्यक्षातला साप पाहून म्हणतात*
*त्याला ठेचून काढा.*
*जंगम भिक्षेसाठी येताच,*
*म्हणतात, पुढे हो*
*खात नाही, त्या लिंगाला मात्र*
*नैवेद्य देतात.*
*वरील गोष्टींचा फायदा उठविण्याचे*
*थोडे जरी कूडलसंगाच्या शरणांना वाटले*
*तरी फुटाल ढेकळासारखे*
*पत्थरावर आदळणाऱ्या*

जेव्हा अशाप्रकारची वैश्विक जाणीवजागृती विकसित होते तेव्हाच लिंगपूजा पूर्णत्वास पोहोचते. हाच आशय त्याने खालील ओळीत सूचकतेने अभिव्यक्त केला आहे.

*मूळ झाडाचे मुख आहे हे ओळखून*
*मुळाशी पाणी घालाल तर*
*अंकूर फुटेल, पालवी फुटेल*
*जंगम लिंगाचे मुख आहे हे जाणून*
*तुम्ही त्याला भोजन द्याल*

*तर तो तुम्हाला मिष्टान्न देईल.*

लिंग आणि जंगम यांच्याविषयीच्या समर्पणभावाचा हा संयोग व्यक्ती आणि समाज यांच्या संयोगाप्रत घेऊन जातो. बसवण्णाच्या आध्यात्मिक मार्गाचे, वाटचालीचे हे एक व्यवच्छेदक लक्षण आहे. लिंगपूजेची फलप्राप्ती म्हणजेच व्यक्तिगत लाभ हा जंगमाच्या पूजेत म्हणजेच सर्व समाजाच्या भल्यात समाविष्ट असतो. अशाप्रकारे त्याच्या कायकाच्या संकल्पनेत एकमेकाश्रयी आणि परस्परपूरक असलेल्या व्यक्ती आणि समाजाच्या कल्याणाचा एकमेळ अंतर्भूत आणि अभिप्रेत आहे.

गांधीजींनी प्रतिपादिलेले रस्किनचे दुसरे तत्व म्हणजे, वकीलाचे काम आणि न्हाव्याचे काम यांचे मूल्य, यांची प्रतिष्ठा समान असते. हेच कायकाचे पायाभूत तत्व आहे. व्यवसायात श्रेष्ठ अथवा कनिष्ठ असे काही नसते हे बसवेश्वराने स्पष्टपणे सांगितले आहे. कायकाची प्रतिष्ठा कामाच्या स्वरुपात असत नाही, ती काम करण्यामागे असलेल्या भूमिकेत, तळमळीत असते.

मारलय्याचा चांभाराचा व्यवसाय बसवेश्वराच्या मंत्रीपदा इतकाच महत्वाच आहे.

काम कोणतेही असो, ते जर संपूर्ण समर्पितभावाने आणि निष्ठेने केले तर ती पूजा, उपासना होते. बसवण्णाच्या काळात या संकल्पनेला केवळ आदर्श म्हणून मान्यता मिळाली एवढेच नाही तर बसवण्णाच्या प्रभावी उपदेशामुळे बाराव्या शतकातील शरणांनी ती मोठ्या प्रमाणात आत्मसात केली. केवळ श्रमाची प्रतिष्ठा आणि महानता स्पष्ट करण्यासाठी नव्हे तर, समाजाच्या सेवेत त्यांचा सहभाग असावा या उद्देशाने त्याने शरणांना शेकडो भिन्न भिन्न व्यवसाय करण्यास प्रोत्साहन दिले.

त्यामुळे भिन्न भिन्न व्यवसाय करीत असलेले शेकडो शरण सांप्रदायिक दिसून येतात. : मडिवाळ माचय्या (धोबी), नुलिया चंदय्या (वाख वळणारा) अंबिगरा चौडय्या (नावाडी ,वल्हेकरी), मेदरा केटय्या (बुरुड), हडपदा अप्पणा (न्हावी), तुरुगाही रामण्णा (गुराखी), संकद बेंकण्णा (ढोलक), मादर धुळय्या (अतिशूद्र), तलवार कामिदेव (पहारेकरी) गाणद कण्णप्पा (तेली), वैद्य संगण्णा (वैद्य), सूजिकायकद रामण्णा (शिंपी), बचिकायकद बसवप्पा (सुतार) कांटण्णद रेम्माव्वे (भात कांडणारी) मोळीगे मारय्य (लाकुडतोड्या) ही आणि अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. त्यांच्या नावामागे जोडलेले शब्द त्यांनी स्वीकारलेल्या कायकाचे निदर्शक आहेत. गुरे वळणे, कपडे धुणे, तेलबियांपासून तेल काढणे, जोडे बनविणे यासारखे व्यवसाय करणारे शरण सांप्रदायिक बसवण्णाच्या मांडीला मांडी लावून अनुभवमंडपात -सामाजिक-धार्मिक विचारमंचात बसू शकत होते आणि तेथील विचार विमर्शात सहभागी होत होते. अशी लक्षणीय कार्यसिद्धी आणि सुधारणा अद्यापही पूर्णपणे आणि प्रभावीपणे प्रत्यक्षात आलेली दिसत नाही.

कायकाचा आणखी एक महत्वाचा पैलू म्हणजे, शारीरिक श्रमाला दिलेले



महत्व, शरीर कष्टातूनच शरीराच्या गरजांची पूर्ती व्हायला हवी. 'कष्टकऱ्याचे जीवनच अर्थपूर्ण असते.' या रस्किनच्या तत्त्वाशी सुसंगत असे हे बसवण्णाचे तत्त्व आहे. बसवण्णाने शारीरिक श्रमाला सर्वोच्च स्थान दिले आणि त्याने स्वत:ही या आदर्शाचे पालन केले. मंत्रीपदावर असतानाही त्याने स्वेच्छेने काबाडकष्ट केले. तो म्हणतो:

*हातात झाडू, डोक्यावर चुंबळ*
*मी कष्टकरी घरगड्याचा मुलगा*
*हे कूडलसंगमदेवा,*
*वारशाने ईश्वरीकृपा लाभलेला*
*मी दासीपुत्र.*

स्वत:ला घरगडी समजून त्यांच्या सटरफटर कामात सहभागी झाल्याचा अनुभवाशय सूचकपणे व्यक्त करणारे हे वचन आहे.

हे वचन गांधीजींच्या उद्‌गाराची आठवण करुन देते. 'आपण सर्वजण भंगी आहोत असे अगदी लहानपणापासूनच आपल्या मनावर ठसविले पाहिजे. आणि ते करण्याचा सर्वात सोपा मार्ग म्हणजे भंग्याप्रमाणे आपण आपली भाकरी कष्ट करुन, राबून मिळविली पाहिजे. अशा प्रकारे विचारपूर्वक भंगीपणा स्वीकारणे म्हणजे समतेचा खरा पुरस्कार करणे होय'. गांधीजींच्या या विचारातील भूमिकाच बसवण्णाच्या कायकात अनुस्यूत असलेली दिसते.

'उत्पादक श्रमा'ला गांधीजी सुबुद्ध किंवा जाणीवपूर्वक असे विशेषण जोडतात. आणि फक्त बुद्धियुक्त उत्पादक श्रमच समाजसेवा ठरतात असे स्पष्टपणे बजावतात. हेच कायकाच्या बाबतीतही खरे आहे. सर्व उद्योग-धंद्यांना अथवा व्यवसायांना कायक संबोधता येत नाही.

एकदा काय होते, खळ्यावर पसरलेले धान्य गोळा करण्याचे कायक करणारा आयदक्की मारय्या अनुभवमंडपात कायकाच्या संदर्भात एक शंका उपस्थित करतो.' जर कायक हाच कैलास असेल आणि श्रम हीच पूजा असेल तर गुरु, लिंग आणि जंगम यांचे प्रयोजन तरी काय? या प्रश्नावर अनुभव मंडपात दीर्घकाळ चर्चा चालते. अखेरीस अल्लम प्रभू कायकाचे स्वरूप स्पष्ट करुन त्याचे मर्म थोडक्यात सांगतात. ते म्हणतात, 'कर्म जेव्हा 'स्व' ला विसर्जित करुन, निरपेक्ष, नि:स्वार्थी वृत्तीने केले जाते, तेव्हाच ते कायक ठरते. अशाप्रकारे कामातून आत्मसंयमनाची अवस्था प्राप्त करण्यासाठी त्रिविधदासोह म्हणजे तन,मन,धन अनुक्रमे गुरु, लिंग आणि जंगम यांना अर्पण करण्याचे तत्त्व आणि व्यवहार अवलंबावा लागतो.

अल्लम प्रभूंच्या या उद्‌गारावर चिंतन मनन करण्यात दंग होऊन गेलेल्या मारय्याला त्या दिवशी आपल्या कायकाचा विसर पडतो. तेव्हा त्याची पत्नी लक्कम्मा काम विसरल्याबद्दल त्यांची कानउघाडणी करते. मग तो कामावर जातो. जेव्हा तो

परत येतो तेव्हा त्याने रोजच्यापेक्षा जास्त धान्य गोळा करुन आणलेले पाहून लकम्मा थक्क होते. मग अधिक धान्य गोळा करण्याचा आधाशीपणा त्याचे कायक होणार नाही; याची ती आठवण करुन देते आणि जास्तीचे धान्य, होते तिथे विखरुन येण्यास बजावते. प्रत्येकाने जर आपल्या गरजेपुरतेच ठेवून घेतले तर जगातील कोणालाच काही कमी पडणार नाही हा कायकाचा एक महत्वाचा पैलू या घटनेतून सूचित होतो.

इथे महात्मा गांधीजींचे अविस्मरणीय शब्द आठवतात: 'आपल्या दैनंदिन गरजा भागविण्याएवढे उत्पादन निसर्ग करीत असतो. जर प्रत्येकाने आपल्या आवश्यकतेपुरतेच घेतले, त्यापेक्षा अधिक काही घेतले नाही, तर जगात भिक्षावृत्ती, भिकारी राहाणार नाही, भूकबळी होणार नाही. 'प्रत्येकाने जर आपल्या गरजेपुरते घेतले आणि शिल्लक उरलेले इतरांच्या भल्याकरिता अनन्यभावाने वापरले तर समाजात सुसंवाद आणि सुव्यवस्था निर्माण होईल. कायकात अंतर्भूत असलेल्या या तत्त्वाची अंमलबजावणी बसवेश्वराच्या काळात अगदी लकम्मासारख्या सर्वसामान्य स्त्रीनेही केली.

जात, धर्म अथवा लिंगनिरपेक्ष, भेदभावरहित स्वसंपूर्ण समाज बसवेश्वराला अभिप्रेत होता. श्रीमंत-गरीब असा भेदही तिथे नव्हता. दरिद्री, कनिष्ठ वर्गातील सर्वस्व हरवलेल्या लोकांशी तो एकरुप होई आणि त्यांना पडणाऱ्या कष्टाचा भार समाजातील इतरांनी स्वेच्छेने उचलला पाहिजे. दारिद्र्य आणि सामाजिक अन्याय यांचे निर्मूलन केले पाहिजे असे तो आग्रहपूर्वक सांगत असे.

अपरिग्रहाला बसवण्णाने सर्वाधिक महत्त्व दिले;आणि त्याची कायकाची संकल्पना या तत्त्वाच्या पायावरच आधारलेली होती. बसवेश्वराच्या आयुष्यातील एक प्रसंग मनोवेधक आहे. एकदा काय झाले, बसवण्णाच्या घरात एक चोर शिरला. घरात दुसरं तिसरं काही सापडलं नाही तेव्हा त्याने नीलांबिकेची म्हणजे बसवण्णाच्या पत्नीची कर्णफुले हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला. त्यासरशी तिला जाग आली आणि ती मोठ्याने किंचाळली. त्यामुळे बसवण्णा जागा झाला आणि त्याने तिला कर्णफुले चोराला देऊन टाकण्यास सांगितले. तो म्हणाला, 'एखादा चोर जर त्याच्यापेक्षा मोठ्या चोराच्या घरात शिरला तर माझ्या दृष्टीने तो दुसरा तिसरा कोणी नसून प्रत्यक्ष कूडलसंगमच असतो. तो स्वत:ला मोठा चोर म्हणवून घेतो कारण सर्वसामान्य माणसाच्या आवाक्यात नसलेले असे काहीतरी त्याच्याकडे होते. गांधीजींच्या विचारसृष्टीशी हे मिळतेजुळते आहे. ते म्हणतात, एका अर्थी आपण चोर आहोत, जेव्हा आपण आपल्यासाठी निकडीचे, तातडीच्या उपयोगाचे नसलेले असे काही घेऊन, त्याचा संचय करतो तेव्हा आपण ते दुसऱ्या कोणाचे तरी चोरलेले असते.'

अशा प्रकारे सामाजिक दृष्टिकोण आणि उत्पादक श्रम याबाबतीत बसवेश्वर



आणि गांधीजी या दोघांच्या विचारात लक्षणीय साम्य आहे. कित्येकदा असे वाटते की जणू, गांधीजी बसवेश्वराची भाषा बोलताहेत आणि त्याच्या तत्वांना पुष्टी देताहेत. गांधीजींनी सर्वोदयाच्या कल्पनेतून जे मांडण्याचा, प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला ते त्यापूर्वीच बसवण्णाने कायकाच्या रुपाने अंमलात आणले होते. असे म्हणता येईल की, बसवण्णाची कायक संकल्पना हा गांधीजींच्या सर्वोदय कल्पनेचा गाभा आहे.

सारांश, माणसामाणसातील समानता, व्यक्तीची प्रतिष्ठा आणि श्रमाची प्रतिष्ठा ही तत्त्व अंगिकारुन कायकाने पारंपारिक वर्णश्रेष्ठत्वाच्या मुळावर घाव घातला. लोकशाही तत्वाशी सुसंगत अशी ही भूमिका आहे. संपत्तीची आणि श्रमाची समान विभागणी हे कायकाचे मुख्य इप्सित होय. बसवण्णाच्या आदर्श समाजाच्या कल्पनेत भिक्षावृत्तीला आणि आळसाला मुळीच थारा नव्हता.

याला समाजाची कायकव्यवस्था असे म्हणता येईल. त्यातील प्रत्येक जण आपल्या शरीराच्या, बुद्धीच्या आणि अंत:करणाच्या गरजांच्या पूर्ततेसाठी म्हणजेच आपल्या आंतरिक शक्तीच्यां सर्वांगीण विकासासाठी प्रयत्नशील असतो. आर्थिक, सामाजिक अथवा धार्मिक अशी कोणत्याही प्रकारची पिळवणूक सहन केली जात नाही. प्रत्येकजण आपापल्या कुवतीनुसार कष्ट करतो आणि आपल्या व्यवसायाद्वारे प्रगतीतून झालेल्या मिळकतीद्वारे समाजाची सेवा करतो. तिथे हावरेपणा, लोभ नसतो म्हणून कृत्रिम टंचाई नसते आणि सामाजिक अन्याय किंवा दडपशाही नसते. अस्पृश्य मानले गेलेल्यांसह सर्वांना जीवनाच्या सर्व क्षेत्रात समान संधी असतात. प्रत्येकजण आपल्या प्रयत्नाने कोणाही मध्यस्थाच्या मदतीशिवाय आध्यात्मिक मार्गाने मुक्ती मिळवितो. कर्मकांडाचे अस्तित्व उरत नाही. त्रिविध दासोह म्हणजेच, गुरु, लिंग आणि जंगम यांच्याविषयीच्या अनन्य शरणभावात श्रम आणि उपासना यांचे ऐक्य सामावलेले असते. त्यामुळे स्वार्थ परमार्थात विलीन होतो. हा काही कोणा स्वप्नाळू तत्त्ववेत्याचा भाबडा आदर्शवाद नव्हे; तर हे नव्या युगाच्या प्रेषिताचे, एका कृतीवीराचे द्रष्टे विचार आहेत.

या 'कायका' च्या तत्त्वप्रभावाने युगानुयुगे प्रभावी ठरलेल्या धार्मिक, सामाजिक स्वरुपाच्या वेडगळ समजुतींमधून लोकांची सुटका केली आणि स्वावलंबन, आत्मविश्वास, स्वतंत्र बाणा आणि विचारस्वातंत्र्य या मूल्यांची पुनर्स्थापना केली. कायकाचा अर्थ यथायोग्य रीतीने समजून घेतला तर, त्याच्या प्रकाशात आपल्याला विज्ञान युगातील समस्या सोडविण्याचा मार्गही सापडू शकेल.

# 5

# श्रेष्ठ कवी

"श्रेष्ठ व्यक्ती दुर्मिळ असते, श्रेष्ठ कवी त्याहून दुर्मिळ, पण श्रेष्ठ कवी असलेली व्यक्ती तर सर्वात दुर्मिळ' असे एक सुप्रसिद्ध वचन आहे. श्रेष्ठ व्यक्ती आणि श्रेष्ठ कवी यांच्या अतिदुर्मिळ संयोगाचे उत्तम उदाहरण म्हणजे बसवेश्वर होय. साक्षात्कारी संत, समाजसुधारक, स्वयंप्रज्ञ तत्ववेत्ता आणि नव्या युगाचा प्रेषित अशा अनेकविध रुपवैशिष्ट्यांचा संयोग बसवेश्वराच्या व्यक्तिमत्वात झाला होता. साहित्यकृती निर्माण करणे हे त्याचे प्रमुख उद्दिष्ट नव्हते, तर जीवनाचे परमोच्च श्रेयस प्राप्त करुन घेणे आणि सर्वसामान्य माणसाच्या परमकल्याणाचा मार्ग खुला करणे हे त्याचे मुख्य उद्दिष्ट होते.

शाश्वत सत्याचा आणि आदर्शांचा जनसामान्यात प्रसार करणे आणि प्रत्येक घराघरात, मनामनात ईश्वराचा संदेश पोहोचविणे ही त्याची महत्त्वाकांक्षा होती. त्यामुळे आपल्या मनाला प्रेरणा देणारा, बुद्धीला चेतविणारा किंवा अंत:करण फुलविणारा प्रत्येक विचार किंवा भाव त्याने साध्या पण सामर्थ्यशाली 'वचन'रुपात अभिव्यक्त केला.

खरे तर, १२ व्या शतकात वचने लिहिणाऱ्या सर्वच शरण सांप्रदायिकांचा हा दृष्टिकोण असे. आपले आध्यात्मिक तत्त्वविचार आणि अनुभव तसेच समाजाची वैगुण्ये, दोष हे सर्वांना समजेल अशा भाषेत अभिव्यक्त करण्याची त्यांची मनीषा होती. त्यामुळे समाजाच्या परमोत्कर्षाच्या, परमोद्धाराच्या आपल्या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी एखादा अभिनव रचनाप्रकार आकारित करण्याची गरज होती. या प्रयत्नांतून त्यांच्या मुखातून जे शब्द बाहेर पडले तीच वचने होत. महापुराच्या लोंढ्याने एखाद्या डबक्याला वेढून आपल्यात मिसळून टाकावे तशी ती अवतीर्ण झाली आणि त्यांनी कन्नड साहित्याचा अवघा प्रवाह, बाज बदलून टाकला.

"साहित्य ही मूलत: जीवनाची भाषेच्या माध्यमातून केलेली अभिव्यक्ती असते." असे डब्ल्यू. एच् हडसन आपल्या 'ॲन इंट्रोडक्शन टू दी स्टडी ऑफ लिटरेचर' या ग्रंथात म्हणतो. हे एकंदर वचनसाहित्याला तर लागू पडतेच परंतु, खास करुन बसवण्णाच्या वचनसाहित्यालाही लागू पडते. त्याने जीवनाकडे सम्यकपणे पाहिले



आणि भौतिक पातळीवरील नेहमीच्या जीवनसंघर्षापासून ते श्रेष्ठ अतिभौतिकीय (अध्यात्मिक) पातळीवरील सर्वोच्च अनुभवापर्यंतच्या अनेक दृष्टिकोणांतून पाहिले. सूक्ष्म निरीक्षणशक्ती आणि द्रष्टी प्रतिभा असल्यामुळे त्याला अनुभवाचा तळठाव घेता आला. सूक्ष्म निरीक्षण आणि विविधांगी (बहुविध) अनुभव यांनी समृद्ध झालेली त्याची प्रज्ञाप्रतिभा वचनरुपात आविष्कृत झाली.

'वचन'चा शब्दश: अर्थ गद्य असा आहे. पण इथे आविष्काराचे माध्यम म्हणून त्याला नवे परिमाण प्राप्त झाले आणि त्याने कन्नड साहित्यात नव्या युगाचा प्रारंभ केला. शरणांनी रचलेली वचने गद्यात्मक आहेत परंतु; त्यात काव्याचा उत्स्फूर्त सूर आहे. काव्याची भावमधुरता आणि गद्याची संथ लय असलेले गद्यपद्य (ललित गद्य) असे त्यांना म्हणता येईल. वचनांना छंदविषयक अथवा लय-ताल विशिष्ट असे काही खास नियम नसले तरी त्यांना स्वत:ची अशी एकरेषीय प्रवाही लयबद्धता, ओघवती रीत असते. कधीकधी ही वचने छंदविरहित असतात तरीही वैचारिक आशय आणि तीव्र भावनाशयाने ती उत्कट बनतात.

अतिभौतिकीय विवरण करणारी किंवा प्रदीर्घ वर्णन असलेली वचने वगळता अन्य वचने सामान्यत:आटोपशीर असतात आणि त्यांच्या अखेरीस वचनकाराच्या उपास्यदैवताविषयीच्या अनन्यशरणभावाची मुद्रा असते; जसे की, बसवण्णाच्या वचनाच्या अखेरीस कूडलसंगमदेव, अल्लमप्रभूंच्या वचनाच्या अखेरीस गुहेश्वर तर अक्कमहादेवीच्या वचनांच्या अखेरीस चन्नमल्लिकार्जुनाला शरण गेल्याची निदर्शक मुद्रा असते.

बसवण्णा हा काही 'वचन' या रचनाप्रकाराचा मूळ निर्माता नव्हे. बसवण्णाच्या पूर्वी देवर दासीमय्याने सुघड, रचनाकौशल्य आणि समर्थ आशय असलेली असंख्य वचने रचलेली आढळतात किंवा असे म्हणता येईल की, तो बसवण्णाच्यापेक्षा वयाने वडील असलेला समकालीन वचनकार होता. सध्या तरी दासीमय्या हा आद्य वचनकार असल्याचे सर्वसाधारणपणे मानले जाते; परंतु दासीमय्याच्या पूर्वी वचनप्रकार अस्तित्वात असण्याचीही शक्यता आहे. जेव्हा असंख्य वीरशैव स्त्री-पुरुष संतांनी बसवेश्वर प्रणीत सामाजिक-धार्मिक क्रांतिकार्यात भाग घेतला आणि आपल्या अभिव्यक्तीसाठी वचन प्रकार निवडला तेव्हा या रचनाप्रकाराला एक नवी झळाळी, नवे सामर्थ्य प्राप्त झाले.

तथापि, वचनसाहित्यातील बसवेश्वराचे श्रेष्ठत्व वादातीत आहे. त्याने हा रचनाप्रकार जोपासला, समृद्ध केला आणि वैश्विक साहित्याच्या उंचीपर्यंत नेला. त्याची वचने म्हणजे जणू भक्तीच्या तळमळीचा उत्कट उत्स्फूर्त आविष्कार; दुर्लभ अशा आध्यात्मिक गूढ अनुभूतीची आस आणि अतिभौतिकीय ध्यानधारणेतून प्राप्त झालेल्या आंतर्दृष्टीचा समर्थ आविष्कारच होय. थोडक्यात सांगायचे तर ती '[illegible]

आणि 'पारलौकिक' अशा समृद्ध जीवनानुभवाची समर्थ अभिव्यक्ती आहे.

आपला विशाल अनुभव वाचकाच्या हृदयाला थेटपणे भिडविण्याचे लक्षणीय सामर्थ्य बसवण्णाकडे आहे. त्याने योजिलेली रुपके-प्रतीके, उपमा- उत्प्रेक्षा, कल्पनावैभव आणि शब्दचित्रे, दृष्टांत आणि उदाहरणे, म्हणी-वाक्प्रचार आणि लोकजीवनात रुळलेले असंख्य शब्दप्रयोग त्याच्या व्यापक अनुभवक्षेत्राचे आणि मानवजातीबद्दल वाटणाऱ्या करुणेचेच केवळ नव्हे तर, श्रेष्ठ कलाभिव्यक्तीचेही जिवंत साक्षीदार आहेत.

प्राचीन कन्नड काव्यातील साहित्यिक भाषा आणि जनसामान्यांची दैनंदिन व्यवहाराची भाषा यातील वाढलेले कृत्रिम अंतर दूर करण्यात तो यशस्वी झाला. साध्या, सोप्या पण चैतन्यपूर्ण शब्दात त्याने आपला समृद्ध अनुभव, गाढआंतर्दृष्टी, दिव्य आध्यात्मिक जाणीव अभिव्यक्त केली. त्यामुळे कन्नड साहित्याच्या आशयाभिव्यक्तीत मोठी क्रांती घडून आली.

त्याची वचने हृदयाच्या गाभ्यातून उत्स्फूर्तपणे उसळी मारुन वर येतात आणि त्यांच्या भाषेचा ओघ सहजसुलभ आणि आकर्षक असतो. त्याच्या वचनातील अलंकारसुद्धा मुद्दाम किंवा कृत्रिमपणे वापरलेले नसतात तर ते सहजस्वाभाविक असतात; त्याच्या अनुभवाच्या आविष्कारासाठी अपरिहार्य आणि सहजस्फूर्त असतात. पिंडरच्या शब्दात सांगायचे तर शब्द आणि विचार सहोदर असतात. या संदर्भात, अगदी शरण सांप्रदायिकांमध्येसुद्धा अल्लमप्रभू, अक्कमहादेवी किंवा क्वचितप्रसंगी चन्नबसवण्णा, सिद्धराम अशा थोड्या फार लोकांनाच त्याची उंची गाठता आली.

त्याच्या वचनातील बहुस्तरीयतेचा उत्तम नमूना म्हणून पुढील वचन पाहू --

*बोलायचे असेल तर शब्द हवेत*
*जणू धाग्यात गुंफलेले मोती!*
*बोलायचे असेल तर शब्द हवेत*
*जणू लखलखते माणिक!*
*बोलायचे असेल तर शब्द हवेत*
*जशी निळाईला छेदणारी स्फटिकरेषा*
*बोल असे हवे की, ईश्वरानेही ग्वाही द्यावी,*
*'होय, हे सत्यपूर्ण आहे'! अशी*
*पण जर कृतीने उक्तीचा विश्वासघात केला,*
*तर कूडलसंग गय करील काय?*
*(पृ.४६)*

एका परीने या वचनात त्याने स्वत:च आपल्या वचनांचे मर्म सूचित केले आहे. मोत्याच्या गुणवत्तेपासून ते आत्मशोधाच्या आध्यात्मिक श्रेष्ठतेपर्यंत उपमा कशी



विकसित (उमलत) होत जाते हे पाहाणेही वेधक आहे. उक्ती आणि कृती यांचा एकमेळ झाला पाहिजे तरच ईश्वराची कृपा लाभते असे तो शेवटच्या चरणात सांगतो. बसवण्णात आपल्याला उक्ती आणि कृती यांचा दृढ संयोग आढळतो. त्याने आपले कर्तत्व आणि वाग्विभव ईश्वराला प्रसन्न करण्यासाठी समर्पित केले आणि आपल्या वचनातून त्याची गौरवगीते गाइली. इतकी एकरुपता खरोखरच दुर्मिळ आहे.

बसवण्णा हा कविता करण्यास कटिबद्ध असलेला कवी नाही किंवा निसर्गसौंदर्याचे वर्णन करण्यातही त्याला स्वारस्य नाही. त्याचे काव्य जीवनाचे काव्य आहे. जीवनातील सौंदर्य आपोआपच काव्य बनून त्याच्या शब्दात अवतरले. त्याने चित्रित केले आहे ते अंतरात्म्याचे सौंदर्य. त्याच्या वचनात आपल्याला साधकाच्या मार्गावरील तऱ्हेतऱ्हेच्या सर्व टप्प्यांचे दर्शन घडते. ऐहिक जीवनाच्या मर्यादा आणि त्याची अपूर्णता, मनाची क्षुद्रता आणि विश्वासघातकीपणा, दंभ, ढोंग, तथाकथित धार्मिक लोकांचा मानभावीपणा, दुटप्पी वर्तन एका बाजूला आणि अंत:करणाची शुद्धता, उच्चतर टोकाची भक्ती, शरणांची उदात्त दृष्टी दुसऱ्या बाजूला-- या सगळ्याचे आदर्श मानवी जीवनाच्या पार्श्वभूमीवर केलेले चिंतनशील आणि कलात्मक चित्रण त्याच्या वचनात आहे.

रटाळ, दैनंदिन जीवनाच्या मर्यादा, त्याची अपूर्णता याचा त्याने केलेला शब्दाविष्कार इतका प्रभावी आहे की, त्यामुळे वाचक आपोआप अंतर्मुख होतो. स्वत:ला केंद्रवर्ती कल्पून आत्मभानाचा आणि आत्मशोधाचा असामान्य आविष्कार त्याने आपल्या वचनात केला. एका वचनात तो म्हणतो;

*माझे जीवन जणू उंदीर*
*थैलीच्या ढिगाऱ्यात लपविलेला*
*मृत्यूशिवाय त्याला शांती नाही.*

थैलीच्या उभ्या-आडव्या धाग्यात अडकलेल्या उंदराची उपमा तो वापरतो. उपमा थेट हृदयाला भिडते आणि आपल्याला जाणवते की, आपण काही या उंदरापेक्षा निराळे नाही. दुसऱ्या एका वचनात तो म्हणतो,:

*माझी दुर्दशा आहे बेडकासारखी*
*सापाच्या फण्याच्या सावलीतल्या.*
*हे अनंतरंगी विश्व आहे हातमिळवणीसारखे*
*साप आणि गारुड्याच्या*
*जेव्हा लौकिक जग रुपी साप*
*आपले विष माझ्यात भिनवेल --*
*ते पंचेंद्रियांना आमंत्रित करतील.*
*मग पुढे गती नाही.*

अशा शेकडो, एकापेक्षा एक सरस उपमा काढून दाखविता येतील. अविवेकाची उलथापालथ निर्देशित करण्यासाठी तो 'पाकोळीच्या जीवना'ची उपमा देतो. मर्त्य जिवांची लौकिक जीवनाचा आस्वाद घेण्याची, आनंद शोधण्याची धडपड दर्शविताना तो जवळून जाणाऱ्या माशीकडे वखवखलेल्या नजरेने पाहाणारा, सापाच्या तोंडातील बेडूक किंवा मंडपाच्या सुशोभनासाठी लावलेल्या फांद्यांचा पाला ओरबाडून खाणारी बलिवेदीकडे चाललेली बकरी अशा उपमा देतो. तो अत्यंत प्रभावीपणे मानवी मनाची तुलना देशी अंजिराशी, फांदीवरील माकडाशी, पालखीतील कुत्र्याशी आणि तुपासाठी तरवारीचे पाते चाटणाऱ्या कुत्र्याशी करतो. त्याच्या प्रत्येक वचनात अशी उदाहरणे सापडतात.

त्याच्या काही वचनांमध्ये त्याच्या अंतरात्म्याचा आर्त चित्कार सुंदर रीतीने प्रतिध्वनित झाला आहे.

उदाहरणार्थ

*देवा, तो तू आहेस,*
*ज्याने माझ्या डोळ्यापुढे*
*हे हिरव्यागार संवेदनांचे कुरण पसरले.*
*तृप्तीला काय समजते?*
*ती हिरवेपणाकडे व गवताकडे खेचली जाते*
*या संवेदनेतून मला सोडव*
*अन् तृप्त होईपर्यंत पावित्र्याचा घास भरव*
*माझी तृषा ज्ञानामृताने भागव*
*हे कूडलसंगमदेवा, माझी काळजी घे.*

खालील वचनात मनाच्या दुबळेपणाचे आणि चंचलतेचे सूचक आणि अन्वर्थक चित्र उमटले आहे.

*जणू कुंपणावरचा सरडा,*
*तसे माझे मन, हे देवा.*
*दरवेळी रंग बदलणारा सरडा,*
*तसे माझे मन*
*जणू फडफडणारी पाकोळी*
*तसे माझे मन*
*अगदी फाटकाजवळ तांबडे फुटले*
*तरी सरत्या रात्री जाग आलेल्या*
*आंधळ्याला त्याचे काय होय?*
*निरपेक्ष भक्तीची इच्छा*



*असे काही असते तरी काय?*
*अगा, कूडलसंगमदेवा.*

त्याची भाषा प्रसंगानुरुप असते आणि आपल्या साऱ्या सामर्थ्यानिशी ती आशय मुठीत घेते आणि त्याला आकार देते, असा प्रत्यय आपल्याला त्याच्या प्रत्येक वचनात येतो. त्याच्या आत्म्याची तळमळ अभिव्यक्त करणाऱ्या प्रतिमा ह्या कन्नड भाषेतील उत्कृष्ट प्रतिमा आहेत. एक वचन इथे उद्धृत करु :

*माझे मन वितळव आणि मुशीतून काढ*
*त्यातील हीण नष्ट कर*
*त्याची पारख कर*
*अग्नीत तप्त करुन*
*त्याला शुद्ध कर.*
*टाकीचे घाव घालून*
*त्याला कळेतून जाऊ दे*
*मग, सोने जसे शुद्ध होते*
*तसे माझे हृदय शुद्ध होईल.*
*हे उत्कृष्ट कारागिरा,*
*माझ्या या सोन्याला तासून तासून*
*तुझ्या शिष्याच्या पायातील पैंजण बनव*
*हे कूडलसंगमदेवा, मला वाचव.*

अशा प्रकारे यथोचित काव्यात्मक प्रतिमा, प्रतिके किंवा भव्य शब्दचित्रे यांच्या साह्याने तो नेहमीच कलात्मक उंची गाठतो. त्याच्या वचनातील ओघवतेपणा आणि सुलभ प्रासादिकता मोहक आहे.

दुबळ्या, क्षीण आणि क्षुद्र मनाला भक्ती अप्राप्य असते हे स्पष्ट करुन तो विचारतो, जर आतून शुद्ध नसेल, तर दारुच्या बाटलीला बाहेरुन भस्म लावून काय उपयोग? किंवा, दगड कितीही काळ जरी पाण्यात बुडलेला, भिजलेला असला तरी वाळल्यावर मऊशार थोडाच होणार आहे? शुद्ध अंत:करणाची आवश्यकता आणि भक्तीच्या अवडंबराचा फोलपणा यावर तो जोर देतो.

*वारुळ झोडपले*
*म्हणून साप मरेल काय?*
*कितीही उग्र तप केले तरी,*
*हृदय शुद्ध नसेल तर,*
*कूडल संगम देव त्यावर*
*विश्वास ठेवेल काय?*

ज्यात साप नाही असे झुडुप धोपटण्याचा काही उपयोग नाही. जो घरातील अंधार नष्ट करु शकत नाही, असा दिवा काय कामाचा? तसेच, जी हृदयातील अंधार घालवू शकत नाही, अशी भक्ती काय कामाची?

*हत्तीला भय अंकुशाचे*
*पर्वताला वज्राघाताचे*
*अंधाराला भय प्रकाशाचे*
*जंगलाला वणव्याचे.*
*पंचमहापातकांना भय,*
*कूडलसंगमेश्वराच्या नामाचे.*

अज्ञानाची तुलना प्रमत्त हत्तीशी, पर्वताशी आणि घनघोर अंधाराशी केली आहे. पण शुद्ध मनाने आणि उत्कट प्रेमभावाने ईश्वराचे नामस्मरण केले तर हत्तीला ज्याप्रमाणे अंकुश, पर्वताला ज्याप्रमाणे वज्र आणि अंधाराला ज्याप्रमाणे प्रकाश धाकात ठेवतो त्याप्रमाणे ते अज्ञानाला धाकात ठेवते. या प्रतिमांच्या पुनरावर्तनातून ईश्वराच्या नामस्मरणाचे माहात्म्य प्रतीत होते.

आपण हाताळलेला प्रत्येक विषय वाचकांच्या हृदयापर्यंत पोहोचविण्यात बसवण्णा पूर्णत: यशस्वी झाला. त्याचा सखोल जीवनानुभव, त्याची प्रगाढ आंतर्दृष्टी, विविधांगी ज्ञान आणि कुशाग्र बुद्धिमत्ता यातून त्याची प्रतिभा बहरली आणि अलंकार, प्रतिमा साकारल्या. त्याच्या उत्कट काव्यात केवळ विचार आणि भावनांची उकल आहे असे नाही तर साक्षात्काराचे शिखर गाठलेल्या त्याच्या आध्यात्मिक प्रवासाच्या सर्व टप्प्यांचेही दर्शन आहे. सामाजिक विषमता आणि भेदभावाशी टक्कर देत आध्यात्मिक प्रवासाला प्रारंभ करणाऱ्या साधकाच्या उद्‌गारापासून ते ईश्वरी साक्षात्काराच्या परमोच्च आनंदाच्या अनुभवापर्यंतच्या प्रत्येक भावच्छटेचे वर्णन त्याने केले आहे. आनुभविक जाणीवजागृती, तटस्थ जाणीव जागृती आणि पारमार्थिक जाणीवजागृती असे त्याचे स्थूलमानाने तीन टप्पे सांगता येतील.

बाह्य जगत हा काव्याचा मूलभूत चित्रणविषय. परंतु कवी त्याला कशाप्रकारे भिडतो आणि तो त्यातून कोणते सत्व शोधतो यावर काव्याचे मोठेपण ठरत असते. जगाची विभिन्नरुपे आणि अनेकविधता पाहून बसवण्णाची प्रतिभा स्वर्गात भरारी घेते परंतु लगेचच पृथ्वीला वर उचलून घेण्यासाठी दयार्द्र होऊन खाली उतरते. तो म्हणतो:

*आपले शरीर एक गारुड्याची टोपली*
*मन हा त्यातील नाग*
*पहा कसे गुण्यागोविंदाने नांदतात*
*टोपली आणि नाग.*
*तुम्हाला कल्पना येण्यापूर्वीच*
*तो तुम्हाला ठार करतो,*
*तुम्हाला पत्ता लागण्यापूर्वीच*
*तो तुम्हाला दंश करतो.*
*हे कूडलसंगमदेवा,*
*मी रोज, दिवसानुदिवस तुला पुजले,*
*तर त्याला गुंगी येइल.*



टोपली आणि सापाच्या प्रतिमेतून साधकाच्या मनातील आनुभविक सजगता आणि अनुभवजन्य ज्ञानाच्या पलीकडे जाण्याची आंतरिक तळमळ सुंदर रीतीने व्यक्त होते. अशा प्रकारच्या कलात्मकदृष्ट्या श्रेष्ठ असलेल्या अनेक वचनांमधून बसवण्णाने ऐंद्रिय ज्ञानाच्या उत्तरोत्तर होत जाणाऱ्या विकासावर आणि अखेरीस त्याच्या पलीकडे जाऊन उच्चतर ज्ञान प्राप्त करण्यावर भर दिला आहे.

याच्या पुढचा विकासाचा टप्पा म्हणजे तटस्थ जाणीव. या जाणिवेचेही काव्य प्रतिभेद्वारा केलेले अत्यंत सुस्पष्ट आणि परिणामकारक चित्रण अनेक वचनात आढळते.

*क्रियाशील भक्त आपलं शरीर*
*केळीच्या बुंध्यासारखे*
*पदर न् पदर सोलून काढतो,*
*की नंतर त्यातील काही एक उरु नये.*
*आपणच आपल्याला गिळलेले असते.*
*नीट ध्यानात ठेव, कूडल संगम देवा*
*मला पुन्हा जन्म येऊ न द्यावा.*

आपले कर्म संपूर्ण तटस्थभावाने, साक्षीवृत्तीने केले पाहिजे असे तो इथे सुचवितो.

संसारात (लौकिक जगात) राहिले पाहिजे आणि त्याचवेळी साधकही असले पाहिजे असे तो म्हणतो. या जगापासून दूर पळून जाण्याची आवश्यकता नाही. जे काम आपण अंगिकारले असेल ते त्यापासून अलिप्त राहून केले पाहिजे आणि हे केवळ कायकाद्वारे म्हणजे बुद्धियुक्त कार्याद्वारे साध्य होऊ शकते. पुढील प्रतिमेत त्याने हे परिणामकारक रीतीने अभिव्यक्त केले आहे. -- 'आकाशात झेपावणाऱ्या पतंगालासुद्धा दोराची खेच असणे आवश्यक असते. नायकालाही स्वत:ला खर्ची घालावे लागते, जमिनीच्या आधाराशिवाय गाडी चालू शकेल काय? पतंगाप्रमाणे आपल्याला झेपावायचे असेल तर लौकिक जगाशी असलेला दोर ढिला पडता कामा नये आणि त्याची दिशा योग्य असली पाहिजे. तरच, बसवेश्वराच्या सुरात सूर

मिसळून म्हणता येईल.

*हे मर्त्य जग ही निर्मिकाची टांकसाळ*
*इथे मूल्ययुक्त जगणाऱ्यांना, लाभते मौल्यवान जीवन तिथेही*
*इथले कफल्लक, तिथेही भणंगच राहातात*
*अगा, कूडलसंगमेश्वरा.*
*हे एक अप्रतीम असे सूचक, आशयगर्भ प्रतीक आहे.*

जो साधक अशा प्रकारची संपूर्ण तटस्थता प्राप्त करेल तो जाणिवेच्या अध:स्तरावरील सर्व पातळ्या ओलांडून वर जाईल आणि समरस प्रज्ञ किंवा अंग आणि लिंग यांच्या ऐक्यातून प्राप्त होणारी उच्चतम पारलौकिकावस्था प्राप्त करेल. लिंगांगऐक्याच्या श्रेष्ठतेचे वर्णन करणाऱ्या काही वचनांचा आपण यापूर्वी निर्देश केला आहे. भक्तिरुपी जमिनीत पक्व झालेले आपले जीवनफल त्याने कूडल संगाला कसे अर्पण केले ते ध्यानी आणावे. त्रिविध अशुद्धांचा निरास करुन तो शांततेत विलीन झाला जणू प्रकाश शलाका महातेजात मिसळली. हे आणखी एक वचन पाहा :

*डोळे तृप्त झाल्यानंतर । पाहाण्याजोगे काही उरले नाही ।*
*कान तृप्त झाल्यानंतर । ऐकण्याजोगे काही उरले नाही ।*
*हात तृप्त झाल्यानंतर । कवळण्याजोगे काही उरले नाही ।*
*तव भक्तीने हृदय भरुन आल्यावर । विचार असा काही उरला नाही ।*
*हे कूडलसंगमदेवा । महादेवा.*

बघणे, ऐकणे आणि पूजा करणे (दर्शन, श्रवण आणि पूजन) या सर्वाकडे सर्वसामान्य माणसाच्या रोजच्या अनुभवातून, कवीच्या प्रातिभ अनुभवातून आणि साक्षात्कारी संताच्या दिव्य दृष्टीतून पाहाणे शक्य आहे. जेव्हा दिव्य शक्तीचा स्पर्श अनुभवाला येतो तेव्हा, डोळे, कान, शरीर, मन सारे काही त्या अनुभवाने काठोकाठ भरुन जाते.

दुसऱ्या एका वचनात हा दैवी साक्षात्कार त्याने असा वर्णिला आहे:

*महत्तमाहून थोर मी*
*ब्रह्यामध्ये उदात्त मी*
*कसे वर्णू शब्दात की,*
*कूडलसंगमाच्या दिव्य प्रकाशात न्हाऊन*
*मी शांततेत विलीन झालो आहे.*

दुसऱ्या एका वचनात त्याने सूचित केल्याप्रमाणे, प्रकाशाचा मुकुट प्रकाशावर झळकतो. तेजात तेज मिसळते. अशा प्रकारे गहन गूढ विचार आणि अनुभव तो साध्या समर्थ आणि सूचक तसेच आपली जीवनदृष्टी मूर्त स्वरुपात लोकांपर्यंत पोहोचवणाऱ्या शब्दात अभिव्यक्त करु शकतो.



त्याची वचने वाचल्यावर आपल्याला अरविंदांच्या काव्याच्या व्याख्येची सत्यता पटते. ते म्हणतात, परमोच्च सत्याचा जनसामान्यांच्या भाषेत परिवर्तित केलेला भावानुवाद म्हणजे काव्य. बसवण्णाने जाणिवेच्या सर्व पातळ्यांवरील सत्य अगदी साध्या, जनसामान्यांच्या भाषेत उतरविले आहे. जीवन उदात्त आणि उन्नत करणारे सर्व स्तर आणि सर्व भाव त्याच्या वचनात समाविष्ट आहेत. त्याने गाठलेली आध्यात्मिक उंची, त्याची जीवनदृष्टी, त्याने आक्रमिलेला मार्ग, त्याचे उत्तुंग व्यक्तिमत्व या साऱ्याला वचन या रचनाप्रकारात मूर्त रुप प्राप्त झाले.

सर्वसामान्य माणसाशी असलेल्या जवळिकीने त्याच्या भाषेला लोकभाषेची ढब दिली. तो म्हणींचा सर्रास वापर करतो आणि त्याच्या काही उद्‌गारांना आता म्हणींचे रुप प्राप्त झाले आहे. सामाजिक आणि धार्मिक क्रांतिकारक तर तो होताच पण सर्वसामान्यांच्या भाषेला साहित्यात मध्यवर्ती स्थान देऊन त्याने कन्नड साहित्यातही क्रांती घडवून आणली.

भाषेतली मार्मिकता आणि अनेकार्थसूचकता यावरील त्याचे प्रभुत्व लक्षणीय, केवळ अद्वितीय आहे. अगदी मोजक्या शब्दात जास्तीत जास्त स्पष्ट चित्र उभे करण्यात, शब्दचित्रे रेखाटण्यात तो वाकबगार आहे. त्याचे अलंकार, शब्दांच्या सूक्ष्म अर्थच्छटा, प्रतिमा, शब्दाची निवड म्हणजे जणू चित्रकला आणि संगीत यांचा संयोगच. त्याच्या वचनाची वैशिष्ट्यपूर्ण लय इंग्रजी (अन्य भाषेत) अनुवादात उतरविणे अशक्य आहे. त्या अर्थाने, या पुस्तकात उद्धृत केलेल्या वचनात त्यांची मूळ लयबद्धता उरलेली नाही. त्यात फक्त जमेल तेवढा अर्थाशय अनुवादिला आहे. इतक्या मर्यादा असूनही उद्धृत वचनांतून कल्पनावैभव, आविष्काराचे सौंदर्य आणि भावनिक आशय प्रत्ययाला येतो.

सारांशाने असे सांगता येईल की, बसवेश्वराने लोकांची नाडी ओळखली, या भूमीची वाङ्मयीन आणि आध्यात्मिक परंपरा समृद्ध केली. जीवनाच्या श्रेयसाकडे नेणाऱ्या इच्छा- आकांक्षांबद्दल लोकांना मार्गदर्शन केले आणि अशाप्रकारे कोणतीही पारमार्थिक चळवळ जे साध्य करु शकते ते सर्व त्याने साध्य केले. त्याच्या काळातील काही तात्कालिक पण अटळ बाबी वगळल्या तर बसवेश्वराने सांगितलेली आदर्श तत्वे स्थलकालातीत आहेत.

त्याच्या क्रांतीची अन्वर्थकता, त्याने पाहिलेले आदर्श समाजाचे आणि धर्माचे स्वप्न आणि आपला शाब्दिक उपदेश कृतीत उतरविण्याचे त्याचे साहस, उक्ती व कृती यांचा एकमेळ; याचे आकलन आधुनिक युगातील वाचकांना अधिक चांगले होईल. कार्ल मार्क्स, महात्मा गांधी यासारख्या आधुनिक विचारवंतांनी मांडलेल्या विचारांची बीजे असलेले त्याचे जीवन व्यक्तीला पूर्णत्वाच्या शोधात दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शन करते. आणि आपल्या तेजस्वी किरणांनी सहवासात आलेल्या सर्वांचे जीवनही उजळून टाकते.

# निवडक संदर्भ ग्रंथसूची


## कानडी ग्रंथ (प्राचीन)

१. *अक्कन वचनगळु,* संपा.एल. बसवराज (१९६६)

२. *अल्लमन वचन चंद्रिके,* संपा. एल. बसवराज (१९६६)

३. *बसवपुराण,* संपा. आर.सी. हिरेमठ (१९५८)

४. *बसवण्णनवर वचनगळु,* संपा. एस.एस.बसवानल (१९६२)

५. *बसवराजदेवर रगळे,* संपा. टी.एस. व्यंकण्णय्या (१९६५)

६. *चन्नबसवण्णनवर वचनगळु,* संपा. आर.सी. हिरेमठ (१९६५)

७. *देवर दासीमय्यन वचनगळु,* संपा. एल.बसवराज (१९७०)

८. *लिंगलीलाविलास चरित्र,* संपा.एस.एस.भूसनुर मठ (१९५६)

९. *मोळिगेय मारय्या मत्तू राणी महादेवीय वचनगळु,* संपा. वन्नप्पा उत्तंगी आणि एस.एस. भूसनुर मठ (१९५०)

१०. *शिवदास गीतांजली,* संपा. एल. बसवराज (१९६३)

११. *शून्यसंपादणे,* संपा. एस.एस.भूसनुर मठ (१९५८)

## कानडी ग्रंथ (आधुनिक)

१२. *चिंतामणी हळेपेट,* युगप्रवर्तक बसवण्णनवरु (१९४४)

१३. *गुंजाळ एस.आर.,* बसव साहित्यदर्पण (१९६७)

१४. *जवळि बी.सी.,*धर्म भंडारी बसवण्णनवरु

१५. *मल्लन गौडा,* पाटील, श्री बसवेश्वर मेले होसबेळकु (१९६६)

१६. *श्रीनिवास मूर्ती एम.आर.,* भक्तिभंडारी बसवण्णानवरु (१९३१)

१७. *वचनधर्मसार* (१९४६)

## इंग्रजी

१. *अलबर्ट को. जॉर्ज,* रिलीजन ऑफ मॅच्युअर माईंड

२. *ॲन्ड्र्यू लँग,* मेकिंग ऑफ रिलीजन

३. *अरविंद,* सिंथेसिस ऑफ योग

४. *केर्ड जॉन,* ॲन इंट्रोडक्शन टू फिलॉसॉफी ऑफ रिलीजन

५. *दासगुप्ता एस.एन.,* रिलीजन ॲण्ड रॅशनल आउटलुक

६. *देसाई पी.बी.,* बसवेश्वर ॲण्ड हिज टाईम्स.

७. *देवीरप्पा एच. (संपा.)* वचनाज ऑफ बसवण्णा

८. *गजेंद्रगडकर के.व्ही.,* नीओ-उपनिषदिक फिलॉसॉफी

९. *हिरियण्णा एम.,* आउटलाईन्स ऑफ इंडियन फिलॉसॉफी

१०. *-- उनि-- क्वेस्ट आफ्टर परफेक्शन*

११. *हुणशाळ एस.एम.,* लिंगायत मूव्हमेंट

१२. *जेम्स विल्यमस* - द व्हरायटीज ऑफ रिलीजस एक्स्पीरियन्स

१३. *काणे पी.व्ही.,* हिस्ट्री ऑफ धर्मशास्त्र

१४. *नंदीमठ एस.सी.,* हॅण्डबुक ऑफ वीरशैवीझम

१५. *राधाकृष्णन एस.,* ॲन आयडियालिस्ट व्हयू ऑफ लाईफ

१६. *--- उनि --- सोसायटी ॲण्ड रिलीजन*

१७. *रॉमनीज,* थॉटस ऑन रिलीजन

१८. *रुद्राप्पा जे,* काश्मीर शैवीझम

१९. *साखरे एम.आर.,* लिंगधारण चंद्रिका

२०. *टागोर रविंद्रनाथ,* द रिलीजन ऑफ मॅन

२१. *विल डयूरन्ट,* प्लेझर्स ऑफ फिलॉसॉफी

२२ *वडेयर एस.एस.* (संपा.) श्री बसवेश्वर.